मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची

पुस्तकमाला.



पुस्तक २५ वें.

# दासबोधांतील उपदेशपाठ.

जें जें कांहीं आपणास ठावें,
तें तें हलुहलु शिकवावें ॥

—दासबोध.



संग्राहक,

श्रीयुत विष्णु रघुनाथ लेले, वकील, सोलापुर.

[ द्वितीयावृत्ति. ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव—मुंबई.

सप्टेंबर, १९१७.

किंमत ०–६–०.

माझे वडील

परमपूज्य

तीर्थरूप रा. राघोपंत लेले

यांचे चरणीं

अत्यंत नम्र भावानें

अर्पण

केलें असे.

# अनुक्रमणिका.

१ दोन शब्द. ७
२ विषयप्रवेश. १३

---

१ मंगलाचरण. १७

भाग १ ला,

बालबोधप्रकरण.

१ मूर्खलक्षणें. १९
२ पढतमूर्खलक्षणें. २५
३ उत्तमलक्षणें. २७
४ करंटलक्षण. ३१
५ सदैवलक्षण. ३३
६ दुश्चितलक्षण. ३६
७ दुश्चितपण. ३७
८ आळस. ३७
९ निद्रा, आळस व दुश्चितपण. ३८
१० लेखन. ३९
११ गोड भाषण. ४०
१२ अभिमान. ४०
१३ गुणमहिमा. ४१
१४ जाणतेपण. ४२
१५ जाणत्याची संगती. ४४

१६ शहाणपणाची महती. ४६
१७ सत्संगती. ४७

## भाग २ रा,

### व्यवहारप्रकरण.

१ गृहस्थाश्रम. ५०
२ नित्यक्रम. ५१
३ शिकवण. ५३
४ चातुर्यलक्षण. ६०
५ उत्तमपुरुषलक्षण. ६६

## भाग ३ रा,

### परमार्थप्रकरण.

१ परमार्थस्तवन. ७०
२ प्रपंच आणि परमार्थ. ७१
३ नरदेहप्रशंसा. ७२
४ नरदेहमहती. ७४
५ गुणत्रय. ७५
६ रजोगुण. ७६
७ तमोगुण. ७८
८ सत्त्वगुण. ८०
९ तापत्रय. ८३
१० सद्गुरुलक्षण. ८६
११ गुरु आणि शिष्य. ८७

१२ सच्छिष्यलक्षण. ८८
१३ असच्छिष्यलक्षण. ८९
१४ नरदेहकर्तव्य. ९१
१५ ईश्वर. ९२
१६ ईश्वराचें सगुणत्व. ९३
१७ सगुणभजन. ९४
१८ ईश्वरभक्ति. ९६
१९ नवविधा भक्ति. ९८
२० जनस्वभाववर्णन. १०५

## भाग ४ था,

### लोकनियंतृप्रकरण.

१ निस्पृह उपदेश. १०८
२ महापुरुषलक्षण. ११५
३ महंतपण. ११८
४ महंतलक्षण. १२१
५ महंतकर्तव्य. १२४
६ राजकारण. १२६
७ समर्थपणा. १२७

## परिशिष्ट.

१ मनाचे श्लोक. १३०
२ लघुबोध. १३८

---

# दोन शब्द.

समूळ ग्रंथ पाहिल्याविण, उगाच ठेवी जो दूषण,
गुण सांगतां अवगुण, पाहे तो एक पढतमूर्ख.

–दासबोध.

न्यायमूर्ति रानडे यांची 'मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि' या विषयावरचीं व्याख्यानें वाचण्यांत आलीं व त्यांच्या योगानें जुन्या कवींविषयीं कांहीं तरी वाचावें अशी स्फूर्ति उत्पन्न झाली. श्रीसमर्थ रामदास यांचेविषयीं पूर्वीपासून मनांत पूज्यबुद्धि होती, त्यामुळें समर्थचरित्रच हातांत घेतलें व समर्थांच्या ग्रंथांचें यथाशक्त्या परिशीलन चालू केलें.

शके १२०० नंतर लवकरच पारतंत्र्याची लाट आमच्यावर आदळली. तिची पीछेहाट सोळाव्या शतकांत श्रीशिवछत्रपतींनीं केली. श्रीशिवछत्रपतींनां परिस्थिति अनुकूळ करून देण्याला, व तदनुरूप श्रीशिवछत्रपतींची वृत्ति होण्याला समर्थांचाच बोध कारण झाला आहे. तत्कालीन सर्व साधुवृंदामध्यें पंचायतन मुख्य व त्या पंचायतनांत समर्थांचा अग्रमान. इकडे महाराष्ट्रीयांचा मुकुटमणी शिवाजी समर्थांचा शिष्य. एतावता श्रीसमर्थ रामदास सोळाव्या शतकांत अत्यंत श्रेष्ठ पुरुष होते. त्यांच्या योग्यतेचा व सर्वांगश्रेष्ठ पुरुष त्यांच्यामागून आजपर्यंत झाला नाहीं.

समर्थांचे ग्रंथ वाचित असतां, नव्या नव्या विचारांचे व अमृतोपम बोधांचे प्रसंग पाहून मनाला फार आल्हाद वाटू

लागला, व ज्यांनीं त्या बोधांचा प्रत्यक्ष रसास्वाद घेतला असेल ते धन्य होत, असें मनांत येऊं लागलें.

आमच्या जुन्या पद्धतीनें निरनिराळ्या प्रकारानें मानसिक शिक्षण मिळत होतें. हल्लींच्या शिक्षणपद्धतीनें मानसिक शक्ति विकास पावतात; परंतु त्या शक्तींनां योग्य वळण मिळत नाहीं. ज्यास धर्म नाहीं, तो मनुष्य नव्हे, असें ह्मणतात; परंतु शिक्षणक्रमांत धर्मशिक्षणाला बहिष्कार असल्याकारणानें धर्माची आणि आमची ओळख नाहींशी झाली; धर्मबंधन कमी झाल्या-कारणानें नीतिबंधन नाहींसें झालें, व त्यामुळें आमचें वर्तन सर्वतोपरी अनिर्बंध व निरर्गल झालें. अर्थात्, आमची सर्वतोपरी अवनिति होत चालली. नाहीं ह्मणावयाला अवनतीची मात्र उन्नति होत आहे!

ही जी आज आमची स्थिति, तीच सोळाव्या शतकांत महाराष्ट्राची स्थिति होती. हल्लींप्रमाणेंच त्या वेळींहि धर्म आणि नीति या शिक्षणाची उणीव वाटूं लागली होती, ती उणीव समर्थांनीं 'दासबोध' ग्रंथानें भरून काढली व महाराष्ट्राला उन्नतीच्या मार्गास लावलें.

आजमित्तीला समर्थ नाहींत. ईशकृपेनें पुढें होतील. समर्थांनीं ग्रंथरूपानें अनुग्रह केला आहे; त्यांत व्यवहारोपयोगी अमृताचा संग्रह भरपूर आहे. दासबोधानें सोळाव्या शतकांत जर आमची उन्नति झाली, तर तत्सम अशा या काळीं त्या बोधापासून आह्मांला उन्नतिमार्ग लाधेलच.

दासबोधांतील बोध आत्मप्राप्ति या अंतिम हेतूभोंवतीं गुंफलेला आहे. त्यांत, व्यवहारांतील मुलांच्या लक्षणांपासून

तों परमेश्वराच्या अनंत स्वरूपापर्यंत सर्व प्रकारचे विषय, सिद्धांत व तत्त्वविचार यांचा समावेश झाला आहे. आपल्या सनातन धर्माचीं सर्व तत्वें खऱ्या स्वरूपानें त्यांत दिलीं असून, या एका ग्रंथाचें पूर्ण परिशीलन केलें असतां आमच्या धर्माची माहिती पूर्णपणानें होण्यास कांहीं हरकत नाहीं. श्रीसमर्थ रामदास आणि इतर साधुवृंद यांत एक भेद विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तो हा, कीं, इतर साधुवृंद प्रवृत्तिविरोधपर जरी नसले, तरी निवृत्तिपर होते आणि श्रीसमर्थ प्रवृत्ति व निवृत्ति या दोन्ही मार्गांना सारखें मानणारे होते.

प्रपंच सांडूनि परमार्थ कराल, तेणें तुम्ही कष्टी व्हाल;
प्रपंचपरमार्थ चालवाल, तरी तुम्हीं विवेकी.

—दासबोध, द. १२ स. १.

आधीं प्रपंच करावा नेटका, मग घ्यावें परमार्थविवेका;
तेथें आळस करूं नका, विवेकी हो !

सदर.

असा त्यांचा उपदेश असे. प्रवृत्ति आणि निवृत्ति या दोहोंची सांगड श्रीसमर्थांनीं फारच उत्तम प्रकारानें, आपल्या ग्रंथात, विशेषतः दासबोधांत घातली आहे. त्यामुळें दासबोध हा अप्रतिम ग्रंथ झाला आहे.

याप्रकारें सर्वच दासबोध ग्रंथ अप्रतिम आहे, आणि त्याचें परिशीलन करणें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें कर्तव्य आहे. धर्मनीति-मार्गदर्शक असा ग्रंथ आज नाहीं, असें वाटतें; ती उणीव त्यानें भरून येईलच.

तथापि, आत्मप्राप्ति या अंतिम हेतूसभोंवतीं गुंफलेल्या उपदेशाचा अधिकार विद्यार्थ्यांनां नाहीं. शिवाय, अध्यात्मदृष्टिपर मार्गहि या दर्शेत इष्ट नाहीं. दासबोधाच्या परिशीलनांत असें आढळून आलें, कीं, विद्यार्थिदशेला अनावश्यक अशा गोष्टी एकीकडे काढून बाकीचा बोध ग्रथित केला, तर विद्यार्थ्यांनां धर्म, नीति आणि व्यवहार दाखविणारा असा सुंदर ग्रंथ होऊं शकेल, व अशा प्रकारचा ग्रंथ नाहीं ह्मणून शिक्षणक्रमाला जी हरकत वाटते, ती कांहीं अंशीं तरी दूर होईल. दुसरे समर्थ उत्पन्न होतील, व ते कालानुरूप ग्रंथ करतील; परंतु तोंपर्यंत अशा ग्रंथाचा उपयोग होईल.

या कारणांकरितां पुढील वेंचे ग्रथित केले आहेत व विषयाला अनुसरून ते मागेंपुढें लाविले आहेत. त्यांचें ठोकळ वर्गीकरणहि केलें आहे. या वेंच्यांत जो विषय विद्यार्थ्यांनां समजावून देतां येण्यासारखा नाहीं तो विषय घेतला नाहीं. असें करण्याचा हेतु हे वेंचे नीतिपुस्तक ह्मणून शिकवितां यावे एवढाच आहे, व याच कारणाकरतां दासबोधांतील 'उपदेशपाठ' असें याला नांव दिलें आहे.

एका समासांतील वेंचे काढून त्याला साजेसें नांव दिलें आहे व अशा रीतीनें वेंचे काढून मग त्यांचें वर्गीकरण केलें आहे. त्यामुळें एका विवक्षित नांवाखालच्या वेंच्यांत दुसऱ्याच विषयाला साजणारे वेंचे आलेले असतील. निवडक ओंव्या एकत्र करून विषयवार ओंव्यांची वेगळी मांडणी केली असती तर हा दोष टळला असता; परंतु अशा रीतीनें मूळचें स्वरूप फारच बदललें असतें. तसें स्वरूप बदलण्याचा मला अधिकार आहेसें वाटत नाहीं.

वेंचे काढले आहेत व त्यांचें वर्गीकरण केलें आहे तें मीं आपल्या अल्पबुद्धीप्रमाणें केलें आहे. घेतलेल्या वेंच्यांपेक्षां उत्कृष्ट स्थळें मूळ ग्रंथांत राहिलीं असतील, आणि केलेल्या वर्गीकरणापेक्षां जास्त चांगलें वर्गीकरणहि करतां येण्यासारखें असेल. आहे यापेक्षां उत्तम ग्रंथ जर झालेला नाहीं तर तो सर्वस्वी माझा दोष आहे, त्याबद्दल ज्ञात्यांनीं मला क्षमा करावी.

हा 'दासबोधांतील उपदेशपाठ' व्यवहारनीतिमार्गदर्शक व कल्याणप्रद होवो, हीच श्रीसमर्थचरणीं विनंति आहे.

हा 'उपदेशपाठ प्रकाशांत आणण्याचें सर्व श्रेय, रा. काशीनाथ रघुनाथ मित्र, मासिकमनोरंजनकर्ते यांनां आहे. सबब त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

सरतेशेवटीं, दासबोधाचे जनक श्रीसमर्थ रामदास स्वामी, यांस प्रणाम करून हे प्रस्तावनेचे दोन शब्द पुरे करतों.

सोलापूर, पौष शुद्ध प्रतिपदा,
शके १८२८.

विष्णु रघुनाथ लेले.

---

## दुसऱ्या आवृत्तीसंबंधीं दोन शब्द.

या आवृत्तींत म्हणण्यासारखा कांहींएक फरक केलेला नाहीं. पहिल्या आवृत्तीप्रमाणेंच सर्व व्यवस्था ठेविली आहे.

का. र. मित्र.

मुंबई, गिरगांव, ता. १ सप्टेंबर १९१७.

# विषयप्रवेश.

उपदेशपाठाचे ठोकळ मानानें चार भाग केले आहेत. पहिला भाग 'बालबोधप्रकरण,' यांत साधारणपणें विद्यार्थ्यांच्या अंगीं कोणते गुण असावे, यासंबंधाचें वेंचे आहेत. व्यवहारांत आपली लोकांबरोबर कशा प्रकारची वर्तणूक असावी, यासंबंधाचे वेंचे दुसऱ्या भागांत 'व्यवहारप्रकरण' या सदराखालीं ग्रथित केले आहेत. तिसरा भाग 'परमार्थप्रकरण' किंवा 'धर्मप्रकरण' हा आहे. या भागांतील वेंचे अगदींच त्रोटक आहेत. विद्यार्थिदशेंत, ईश्वर, माया, जीव, शिव, लिंगदेह, ज्ञानदेह, पंचतत्त्वविवरण, अन्वयव्यतिरेक वगैरे विषयांचा ऊहापोह अगम्य आहे. या विषयाचें ज्ञान विद्यार्थिदशेंतच काय, परंतु प्रौढावस्थेंतसुद्धां लवकर होण्यासारखें नाहीं. हे प्रश्न विशेष गुंतागुंतीचे असून ते सोडविणें ह्मणजे अपार अशा अद्वैतसिद्धांतांत शिरणें होय. याकरतां तशा प्रकारचे विषय या प्रकरणांत मुळींच घेतले नाहींत. वर्तमानपत्रें, व्याख्यानें वगैरे साधनांच्या योगानें विद्यार्थिदशेंतसुद्धां धर्मसंबंधीं निरनिराळ्या मतांचा ऊहापोह विद्यार्थ्यांपर्यंत पोहोंचतो. मिशनरींच्या अव्याहत प्रयत्नांमुळें, मूर्तिपूजानिंदा, आचारनिंदा हींसुद्धां विद्यार्थ्यांच्या कानीं वारंवार पडतात व त्यामुळें त्यांचीं मनें चलविचल होऊन ते पाखंडी बनण्याचा संभव असतो. याशिवाय, ईश्वरविषयक कांहीं तरी ज्ञान लहानपणीं मिळणें अवश्य आहे. याकरितां, आमच्या सनातनधर्माची पहिली पायरी दर्शविणारे

वेंचे मात्र यांत घेतले आहेत. कर्मापेक्षां उपासना व उपासने पेक्षां ज्ञान श्रेष्ठ हें सिद्धच आहे. ज्ञानानंतर परमेश्वरप्राप्ती होते परंतु ती परमेश्वरप्राप्ति होण्याला कर्म, उपासना व ज्ञा या तिहींचीहि सांगड पाहिजे. ही सांगड ठेवून आचरण ठेवणे ही परमेश्वरप्राप्तीची पहिली पायरी आहे. ही पहिली पायरी किती महत्त्वाची आहे, व ती कशी प्राप्त करून घ्यावी, हे या प्रकरणांतील उताऱ्यांवरून ध्यानांत येईल.

मुळीं द्रष्टा देव तो एक, त्याचेच झाले अनेक;
समजोनि पाहतां विवेक, उमजों लागे.
देहावेगळी भक्ति फावेना, देहावेगळा देव पावेना,
याकारणें मूळ भजना, देहचि आहे.

( ईश्वराचें सगुणत्व. )

या ओंव्यांवरून मूर्तिपूजेबद्दल काय व्यापक विचार आहेत, हें सहज दिसून येणार आहे. या ओंव्या खुलासेवार समजावून दिल्या तर मूर्तिपूजेविरुद्ध बडबडीनें विद्यार्थ्यांचें मन चलविचल होणार नाहीं. परमेश्वरप्राप्तीला भगवद्भजन हेंच एक साधन असून, त्याचें ठोकळ स्वरूपहि याच प्रकरणांत दर्शविलें आहे. नवविधा भक्तींतील विषय–आणि विशेषत: आत्मनिवेदन हें स्पष्ट समजावून दिलें तर आपल्या धर्माच्या कर्म, उपासना, ज्ञान या त्रयीची कांहीं तरी ओळख होईल. आपल्या धर्माची पहिली पायरी दिसावी, इतकेंच हें प्रकरण व्यापक आहे. यापुढील पायऱ्या दिसण्याकरतां समग्र दासबोध अगर इतर ग्रंथ मुमुक्षूंनी

वाचावे. माझ्या मतें विद्यार्थिस्थितींत पहिल्या पायरीचेंच ज्ञान पुष्कळ होणारें आहे. हें प्रकरण शिकविण्याच्या दृष्टीनें बारीक रीतीनें पाहिलें असतां माझ्या ह्मणण्याची प्रचीति येईल.

जो अन्न देतो उदरासी, शरीर विकावें लागे त्यासी,
जेणें घातले जन्मासी, त्यास कैसें विसरावें ?
अहर्निशीं ज्या भगवंता, सकळ जीवांची लागली चिंता,
मेघ वर्षे जयाची सत्ता, सिंधु मर्यादा धरी.
भूमि धरिली धराधरें, प्रकट होजे दिनकरें,
ऐसी सृष्टी सत्तामात्रें, चालवी जो कां.
ऐसा सर्वात्मा श्रीराम, सांडून धरिती विषयकाम,
ते प्राणी दुरात्मे अधम, केलें पावती.

( नरदेहकर्तव्य. )

या उताऱ्यावरून समर्थांनीं ही पहिली पायरी कशी आंखली आहे, हें दिसून येईल.

उपदेशपाठांतील चवथा भाग 'लोकनियंतृप्रकरण' हा आहे. विद्यार्थ्यांनीं अभ्यासाशिवाय इतर चळवळींत पडावें कीं नाहीं, हा वाद आहे. पडण्यास कांहीं हरकत नाहीं, अशा मताचा मी आहें. अलीकडे आमच्यामध्यें शिक्षण व वाचन यांच्या योगानें जी एक प्रकारची जागृति उत्पन्न होत आहे, ती विद्यार्थ्यांच्या दृष्टीस पडल्यावांचून राहत नाहीं. कोणीहि मनुष्य शिक्षित असला ह्मणजे पुढारी होण्याला पाहतो व हें पाहून विद्यार्थ्यांच्या मनांत आपणहि पुढारी व्हावें, अशी आकांक्षा उत्पन्न होते. पुढारीपणाच्या कामीं किती गुण लागतात, किती प्रयत्न लागतात, केवढी शक्ति

व सामर्थ्य लागतें, याची कल्पनाहि नसल्याकारणानें हल्लीं बहुतेक पुढारी ह्मणविणारांची पुढारीपणांत तिरपीट उडते. पुढारी होण्याची आकांक्षा ज्यांच्या मनांत उत्पन्न होत असेल, अशा विद्यार्थ्याला पुढारी ह्मणजे काय याची कल्पना यावी, या हेतूनें हें प्रकरण घातलें आहे. पुढारीपणाबद्दलचे समर्थांचे या प्रकरणांतील विचार सर्वत्र पुढारी ह्मणविणारांनीं मनन करण्यासारखे आहेत. समर्थांच्या वचनानुरूप पुढारी झाल्या-शिवाय आह्मांला मार्ग नीट लागणार नाहीं. ज्यांनां पुढाऱ्यांचीं कर्तव्यें माहित नाहींत, ते एक दृष्टीनें विद्यार्थीच होत. समर्थ पुढाऱ्यांचे चार वर्ग करतात. १ निस्पृह, २ महापुरुष, ३ महंत व ४ समर्थ. यांत 'समर्थ' पुढारी सर्वश्रेष्ठ होत. या चारहि वर्गांचीं लक्षणें व कर्तव्यें या प्रकरणांत संक्षेपतः दिलीं आहेत. विस्तार मूळ ग्रंथांत पहावा. ज्याप्रमाणें चांगल्या व्यवहारज्ञ मनुष्यांची जरूरी आहे, त्याचप्रमाणें पुढारी माण-सांचीहि जरूरी आहे. त्या शाखेंतील विद्यार्थ्यांचे उपदेशपाठ या प्रकरणांत दिले आहेत. ते वरील कारणांकरतां अस्थानीं वाटणार नाहींत, अशी आशा आहे.

शेवटीं दोन परिशिष्टें दिलीं आहेत. मनाचे श्लोक हें प्रकरण फारच मनोहर व बोधप्रद आहे. पुणें वगैरे ठिकाणीं ब्राह्मण प्रातःकाळीं हें प्रकरण स्तोत्राऐवजीं ह्मणत असत. व इतर लोक संध्येच्या ऐवजीं ह्मणत. ही पद्धत अलीकडे दहावीस वर्षांतच बंद झाली. या प्रकरणांतील वेंचक श्लोक दिल्याशिवाय राहवेना ह्मणून ते दिले असून, लघुबोध प्रकरण लहान मुलांनां उपयुक्त ह्मणून दिलें आहे.

---

# दासबोधांतील उपदेशपाठ.

## मंगलाचरण.

ॐ नमोजी गणनायका, सर्वसिद्धिफलदायका,
अज्ञान-भ्रांति छेदका, बोधरूपा. १
येतां कृपेची निज उडी, विघ्न कांपती बापुडीं,
होऊनि जाती देशधडी, नाममात्रें. २
वंदूनिया मंगळनिधी, कार्य करतां सर्वसिद्धी,
आघात अडथळे उपाधी, बाधूं शकेना. ३
जयास ब्रह्मादिक वंदिती, तेथे मानव बापुडें किती!
असो प्राणी मंदमती, तेहीं गणेश चिंतावा. ४
जे मूर्ख अवलक्षण, जे कां हीनाहून हीन,
तेच होती दक्ष प्रवीण, सर्व विषयीं. ५

दशक १ समास २.

[ २ ]

आतां वंदीन वेदमाता, श्रीशारदा ब्रह्मसुता,
शब्दमूळ वाग्देवता, महामाया. ६
तीहीं वाचां अंतरीं आलें, तें वैखरिया प्रगट केलें,
ह्मणोनि कर्तृत्व जितुकें जालें, तें शारदा--गुणें. ७
जे वेदशास्त्रांची महिमा, जे निरूपमाची उपमा;
जियेकरतां परमात्मा, ऐसें बोलिजे. ८

जें जें दृष्टीनें देखिलें, जें जें शब्दें ओळखिलें,
जें जें मनास भासलें, तितुकें रूप जियेचें. ९
ह्मणून थोराहून थोर, जे ईश्वराचा ईश्वर,
तियेसी माझा नमस्कार, तदंशेंचि आतां. १०

दशक १, समास ३.

[ ३ ]

भक्त प्रेमळ भाविक, सभ्य सखोल सात्त्विक,
रम्य रसाळ गायक, निष्ठावंत. ११
कर्मशीळ आचारशीळ, दानशीळ धर्मशीळ,
शुचिष्मंत पुण्यशीळ, अंतरशुद्ध कृपाळु. १२
संत सज्जन विद्वज्जन, वेदज्ञ शास्त्रज्ञ, महाजन,
प्रबुद्ध सर्वज्ञ समाधान, विमळकर्ते. १३
पंडित आणि पुराणिक, विद्वांस आणि वैदिक,
भट्ट आणि पाठक, यजुर्वेदी. १४
शांति-क्षमा-दयाशीळ, पवित्र आणि सत्त्वशीळ,
अंतरशुद्ध ज्ञानशीळ, ईश्वरी पुरुष. १५
ऐसे परमेश्वराचे जन, त्यांसि माझें अभिवंदन,
जयांचेनि समाधान, अकस्मात् बाणे. १६

दशक १, समास ८.

---

# भाग १ ला.

## बालबोध प्रकरण.

### मूर्खलक्षणें.

ॐ नमोजी गजानना, एकदंता त्रिनयना,
कृपादृष्टीं भक्तजनां, अवलोकावें. १

तुज नमूं वेदमाते, श्रीशारदे ब्रह्मसुते,
अंतरीं वसें कृपावंते, स्फूर्तिरूपें. २

वंदूनि सद्गुरुचरण, करूनि रघुनाथस्मरण,
त्यागार्थ मूर्खलक्षण, बोलिजेल. ३

जन्मला जयांचे उदरीं, तयांसीं जो विरोध करी,
सखी मानिली अंतुरी, तो एक मूर्ख. ४

समर्थावरी अहंता, अंतरीं मानी समता,
सामर्थ्येंवीण करी सत्ता, तो एक मूर्ख. ५

आपली आपण करी स्तुती, स्वदेशीं भोगी विपत्ती,
सांगे वडिलांची कीर्ती, तो एक मूर्ख. ६

अकारण हास्य करी, विवेक सांगता न धरी,
जो बहुतांचा वैरी, तो एक मूर्ख. ७

आपुलीं धरूनियां दुरी, पराव्यासीं मैत्री करी,
परन्यून बोले रात्रीं, तो एक मूर्ख. ८

बहुत जागते जन, तयांमध्यें करी शयन,
परस्थळीं बहु भोजन, करी तो एक मूर्ख. ९

मान अथवा अपमान, स्वयें करी परिच्छिन्न,
सदा व्यसनीं जयाचें मन, तो एक मूर्ख. १०
धरुनि परावी आस, प्रयत्न सांडी सावकाश,
निसुगाईचा मानी संतोष, तो एक मूर्ख. ११
घरीं विवेक उमजे, आणि सभेमध्यें लाजे,
शब्द बोलतां निर्बुजे, तो एक मूर्ख. १२
नायके त्यास शिकवी, वडिलांसी जाणीव दावी,
जो आरजास गोंवी, तो एक मूर्ख. १३
एकाएकीं एकसरा, जाला विषयीं निलाजरा,
मर्यादा सांडोनि सैरा, वर्ते तो एक मूर्ख. १४
आपणाहून जो श्रेष्ठ तयाशीं अत्यंत निकट,
शिकवणीचा मानी वीट, तो एक मूर्ख. १५
औषध न घे असूनि व्यथा, पथ्य न करी सर्वथा,
न मिळे आलिया पदार्था, तो एक मूर्ख. १६
आपणासि जेथें मान, तेथें अखंड करी गमन,
रक्षूं नेणे मानाभिमान, तो एक मूर्ख. १७
सेवक जाला लक्ष्मीवंत, तयाचा होय अंकित,
सर्वकाळ जो दुश्चित्त, तो एक मूर्ख. १८

दशक २, समास १

[ २ ]

विचार न करतां कारण, दंड करी अपराधेंविण,
स्वल्पासाठीं जो कृपण, तो एक मूर्ख. १९

घरीच्यावरी खाय दाढा, बाहेरी दीन बापुडा,
ऐसा जो का वेडमूढा, तो एक मूर्ख. २०

नीच जातीशीं सांगात, योग्यता न जाणतां मित्रत्व,
मार्गे जाय खातखात, तो एक मूर्ख. २१

स्वयें नेणे परोपकार, उपकाराचा अनुपकार,
करी थोडें बोले फार, तो एक मूर्ख. २२

तपीळ खादाड आळशी, कुश्चिळ कुटिल मानसीं,
धारिष्ट नाहीं जयापाशीं, तो एक मूर्ख. २३

विद्या वैभव ना धन, पुरुषार्थ सामर्थ्य ना मान,
कोरडाच वाहे अभिमान, तो एक मूर्ख. २४

लंडी लटिका लबाड, कुकर्मी कुटिल निचाड,
निद्रा जयाची वाड, तो एक मूर्ख. २५

दांत, चक्षु आणि घ्राण, पाणी वसन आणि चरण,
सर्वकाळ जयाचे मळिण, तो एक मूर्ख. २६

क्रोधें अपमानें कुबुद्धि, आपणास आपण वधी,
जयासी नाहीं दृढ बुद्धि, तो एक मूर्ख. २७

जिवलगांसि परम खेदी, सुखाचा शब्द तोही नेदी,
नीच जनांसि वंदी, तो एक मूर्ख. २८

आपणासि राखे परोपरी, शरणागतांसी अव्हेरी,
लक्ष्मीचा भरंवसा धरी, तो एक मूर्ख. २९

जैसें जैसें करावें, तैसें तैसें पावावें,
हें जयासी नेणवे, तो एक मूर्ख. ३०

दुर्जनांचेनि बोलें, मर्यादा सांडोनि चाले,
दिवसा झांकले डोळे, तो एक मूर्ख. ३१
देवद्रोही गुरुद्रोही, मातृद्रोही पितृद्रोही,
ब्रह्मद्रोही स्वामीद्रोही, तो एक मूर्ख. ३२
परपीडेचें मानी सुख, परसंतोषाचें मानी दुःख,
गेले वस्तूचा करी शोक, तो एक मूर्ख. ३३
आदरेंवीण बोलणें, न पुसतां साक्ष देणें,
निंद्य वस्तु अंगिकारणें, तो एक मूर्ख. ३४
तुक तोडोनि बोले, मार्ग सोडोनि चाले,
कुकर्मी मित्र केले, तो एक मूर्ख. ३५
पत राखों नेणे कदा, विनोद करी सर्वदा,
हासतां खिजे पेटे द्वंद्वा, तो एक मूर्ख. ३६
होड घाली अवघड, काजेंवीण करी बडबड,
बोलोंच नेणे मुखजड, तो एक मूर्ख. ३७
वस्त्र शास्त्र दोनी नसे, उंच स्थळीं जाऊनि बैसे,
जो मूर्खावरी विश्वासे, तो एक मूर्ख. ३८

दशक २, समास १

[ ३ ]

तस्करासी वोळखी सांगे, देखिली वस्तु तेचि मागे,
आपुलें अनहित करी रागें, तो एक मूर्ख. ३९
हीनजनांसी बराबरी, बोल बोले सरोत्तरी,
वामहस्तें प्राशन करी, तो एक मूर्ख. ४०

उंची जाऊनि वस्त्र नेसे, चौबारा बाहेरी बैसे,
सर्वकाळ नग्न दिसे, तो एक मूर्ख. ४१

समर्थासीं मत्सर धरी, अलभ्य वस्तूचा हेवा करी,
घरच्या घरीं चोरी करी, तो एक मूर्ख. ४२

संसारदुःखाचेनि गुणें, देवासी गाळी देणें,
मैत्र्याचे बोले उणें, तो एक मूर्ख. ४३

अल्प अन्याय क्षमा न करी, सर्वकाळ धारकीं धरी,
जो विश्वासघात करी, तो एक मूर्ख. ४४

समर्थाचे मनींचा तुटे, जयाचेनि सभा विटे,
क्षणीं बरा, क्षणीं पालटे, तो एक मूर्ख. ४५

अनीतीनें द्रव्य जोडी, धर्म नीति न्याय मोडी,
संगतीचे मनुष्य तोडी, तो एक मूर्ख. ४६

आपुलें अर्थ दुसऱ्यापाशीं, आणि दुसऱ्याचें अभिलाषी,
पर्वत करी हीनासी, तो एक मूर्ख. ४७

अतीताचा अंत पाहे, कुग्रामामध्यें राहे,
सर्वकाळ चिंता वाहे, तो एक मूर्ख. ४८

दोघे बोलत असती जेथें, तिसरा जाऊनि बैसे तेथें,
डोई खाजवी दोनी हातें, तो एक मूर्ख. ४९

उदकामध्यें सांडी गुरळी, पायें पाय कांडोळी,
सेवा करी हीनकुळीं, तो एक मूर्ख. ५०

बहुतांचें उच्छिष्ट अंगिकारी, मुकी वस्तु निधातें मारी,
मूर्खाची संगती धरी, तो एक मूर्ख. ५१

कलह पाहात उभा राहे, ते सोडवीना, कौतुक पाहे,
खरें असतां खोटें साहे, तो एक मूर्ख. ५२
लक्ष्मी आलियावरी, मागील ओळखी न धरी,
देवीं ब्राह्मणीं सत्ता करी, तो एक मूर्ख. ५३
आपलें काज होय तोंवरी, बहुसाल नम्रता धरी,
पुढिलांचें कार्य न करी, तो एक मूर्ख. ५४
अक्षरें गाळूनि वाची, कांहीं घाली पदरींचीं,
निगा न करी पुस्तकाची, तो एक मूर्ख. ५५
आपण वाचीना कधीं, कोणास वाचावया नेदी,
पुस्तक बांधोनि ठेवी बंदीं, तो एक मूर्ख ५६
सांडोनियां जगदीशा, मनुष्याचा मानी भरंवसा,
सार्थकेंवीण वेंची वयसा, तो एक मूर्ख. ५७
ऐसीं हीं मूर्खलक्षणें, श्रवणें चातुर्य बाणे,
चित्त देऊनियां शहाणे, ऐकती सदा. ५८
लक्षणें अपार असती, परी कांहींएक यथामति,
त्यागार्थ बोलिलों श्रोतीं, क्षमा केली पाहिजे. ५९
उत्तम लक्षणें घ्यावीं, मूर्खलक्षणें त्यागावीं,
पुढील समासीं आघवीं, निरूपिलीं. ६०

दशक १, समास १.

## पढतमूर्खलक्षणें.

मागां सांगितलीं लक्षणें, मूर्खाअंगीं चातुर्य बाणे,
आतां ऐका शाहाणे, असोनि मूर्ख. १
तया नांव पढतमूर्ख, श्रोतीं न मानावें दुःख,
अवगुण त्यागितां सुख, प्राप्त होय. २
बहुश्रुत आणि व्युत्पन्न, प्रांजळ बोले ब्रह्मज्ञान,
दुराश आणि अभिमान, धरी तो एक पढतमूर्ख. ३
मुक्तक्रिया प्रतिपादी, सगुणभक्ती उच्छेदी,
स्वधर्म आणि साधन निंदी, तो एक पढतमूर्ख. ४
आपुलेनि ज्ञातेपणें, सकळांशीं शब्द ठेवणें,
प्राणिमात्रांचें पाहे उणें, तो एक पढतमूर्ख. ५
रजोगुणी तमोगुणी, कपटी कुटिलअंतःकरणी,
वैभव देखोनि वाखाणी, तो एक पढतमूर्ख. ६
समूळ ग्रंथ पाहिल्यावीण, उगाच ठेवी जो दूषण,
गुणं सांगतां पाहे अवगुण, तो एक पढतमूर्ख. ७
लक्षणें ऐकोनि मानी वीट, मत्सरें करी खटपट,
नीति नायके उद्धट, तो एक पढतमूर्ख. ८
जाणपणें भरीं भरे, आला क्रोध नावरे,
क्रियाशब्दास अंतरे, तो एक पढतमूर्ख. ९
श्रोता बहुश्रुतपणें, वक्तयासी आणी उणें,
वाचाळपणाचेनि गुणें, तो एक पढतमूर्ख. १०
दोष ठेवी पुढिलांसी, तेच स्वयें आपणापाशीं,
ऐसें कळेना जयासी, तो एक पढतमूर्ख. ११

अभ्यासाचेनि गुणें, सकळविद्या जाणें,
जनासी निववूं नेणे, तो एक पढतमूर्ख. १२
जेणें उणीव ये अंगासी, तेंचि दृष्टी धरीं मानसीं,
देहबुद्धि जयापाशीं, तो एक पढतमूर्ख. १३
भरोनि वैभवाचे भरीं, जीवमात्रासि तुच्छ करी
पाखांड मत थावरी, तो एक पढतमूर्ख. १४
श्रवण होतां अभ्यंतरीं, गुणदोषांची चाळणा करी,
परभूषणें मत्सरी, तो एक पढतमूर्ख. १५
न मनी तीर्थ न मनी क्षेत्र, न मनी देव न शास्त्र,
पवित्रकुळीं जो अपवित्र, तो एक पढतमूर्ख. १६
आदर देखोनि मन धरी, कीर्तीवीण स्तुति करी,
सर्वांचि निंदी, अनादरी, तो एक पढतमूर्ख. १७
मागें एक पुढें एक, ऐसा जयाचा दंडक,
बोले एक करी एक, तो एक पढतमूर्ख. १८
यथार्थ सांडून वचन, जो रक्षूनि बोले मन,
ज्याचें जिणें पराधीन, तो एक पढतमूर्ख. १९
सोंग संपादी बरिवरी, करूं नये तेंचि करी,
मार्ग चुकोनि भरे भरीं, तो एक पढतमूर्ख. २०
रात्रंदिवस करी श्रवण, न सांडी आपले अवगुण,
स्वहित आपलें नेणे आपण, तो एक पढतमूर्ख २१
निरूपणीं भले भले, श्रोते येऊनि बसले,
क्षुद्रें लक्षूनि बोले, तो एक पढतमूर्ख. २२
त्यागावया अवगुण, बोलिलों पढतमूर्खाचें लक्षण,
विचक्षणीं न्यून पूर्ण, क्षमा केलें पाहिजे. २३

दशक २ समास १०.

## उत्तमलक्षणें.

श्रोतीं व्हावें सावधान, आतां सांगतों उत्तम गुण,
जेणेंकरितां बाणे खूण, सर्वज्ञपणाची. १
वाट पुसल्यावीण जाऊं नये, ओळखल्यावीण खाऊं नये,
पडिली वस्तु घेऊं नये एकाएकीं. २
अति वाद करूं नये, पोटीं कपट धरूं नये,
छद्म काढुनि बोलूं नये, कांहीं केल्या. ३
विवंचनेवीण चालूं नये, मर्यादेवीण हालूं नये,
विचारेंवीण बोलूं नये, कांहींएक. ४
प्रीतीवीण रुसूं नये, चोरासी ओळखी पुसूं नये,
रात्रीं पंथ क्रमूं नये, एकाएकीं. ५
जनीं आर्जव तोडूं नये, पापद्रव्य जोडूं नये,
पुण्यमार्ग सोडूं नये, कदाकाळीं. ६
निंदा द्वेष करूं नये, असत्संग धरूं नये,
द्रव्यादिक हरूं नये, बलात्कारें. ७
वक्तयास खोदूं नये, ऐक्यतेस फोडूं नये,
विद्या अभ्यास सोडूं नये, कांहींकेल्या. ८
ताडाळाशीं भांडूं नये, वाचाळाशीं तंडूं नये,
संतसंग खंडूं नये, अंतर्यामीं. ९
अति क्रोध करूं नये, जिवलगासि खेदूं नये,
मनीं वीट मानूं नये, शिकवणीचा. १०
क्षणक्षणा रुसूं नये, लटिका पुरुषार्थ बोलूं नये,
केल्यावीण सांगूं नये, आपुला पराक्रम. ११

बोलिला बोल विसरूं नये, प्रसंगीं सामर्थ्य चुकूं नये,
केल्यावीण निखंदूं नये, पुढिलांसी कदा. १२
आळसें सुख मानूं नये, चहाडी मनासी आणूं नये,
शोधल्यावीण करूं नये, कार्य कांहीं. १३
सुखा आंग देऊं नये, प्रयत्न पुरुषें सांडूं नये,
कष्ट करतां त्रासूं नये, निरंतर. १४
सभेमध्यें लाजूं नये, बाष्कळपणें बोलूं नये,
पैज होड घालूं नये, कांहींकेल्या. १५
बहुत चिंता करूं नये, निसुगपणें राहूं नये,
कोणासही पाहूं नये, पापबुद्धी. १६
कोणाचा उपकार घेऊं नये, घेतला तरी राखूं नये,
परपीडा करूं नये, विश्वासघात. १७
शौचेंवीण असूं नये, मळिण वस्त्र नेसूं नये,
जाणारासि पुसूं नये, कोठें जातोस ह्मणूनी. १८
व्यापकपण सोडूं नये, पराधीन होऊं नये,
आपलें ओझें घालों नये, कोणीएकासी. १९
पत्रेंवीण पर्वत करूं नये, हीनाचें ऋण घेऊं नये,
ग्वाहीवीण जाऊं नये, राजद्वारीं. २०

दशक २, समास २.

[ २ ]

लटकी जाजू घेऊं नये, सभेसि लटकें करूं नये,
आदर नसतां बोलूं नये, स्वाभाविक. २१

अदेखणेपण करूं नये, अन्यायाविण गांजूं नये,
अनीतीनें वर्तूं नये आंगबळें. २२
बहुत अन्न खाऊं नये, बहुत निद्रा करूं नये,
बहुत दिवस राहूं नये, पिशुनाचे येथें. २३
आपुल्याची ग्वाही देऊं नये, आपुली कीर्ति वर्णूं नये,
आपले आपण हांसूं नये, गोष्टी सांगोनी. २४
धूम्रपान घेऊं नये, उन्मत्तद्रव्य सेवूं नये,
बहुवाचाळाशीं करूं नये, मैत्री कदा. २५
कामेंवीण राहूं नये, नीच उत्तर साहूं नये,
आसुदें अन्न सेवूं नये, वडिलांचेंही. २६
तोंडीं शिवी असूं नये, दुसऱ्यास देखोनि हांसूं नये,
उणें अंगीं संचरूं नये, कुळवंताचे. २७
देखिली वस्तु चोरूं नये, बहुत कृपण होऊं नये,
जिवलगांशीं करूं नये, कलह कदा. २८
एकाचा घात करूं नये, लटकी ग्वाही देऊं नये,
अप्रमाण वर्तूं नये, कदा काळीं. २९
चहाडी चोरी करूं नये, परद्वार करूं नये,
मागें उणें बोलों नये, कोणाएकाचें. ३०
समयीं यावा चुकूं नये, सत्त्वगुण सांडूं नये,
वैरियासीं दंडूं नये, शरण आलियां. ३१
अल्पधनें माजूं नये, हरिभक्तीस लाजूं नये,
मर्यादेंवीण चालूं नये, पवित्र जनीं. ३२

मूर्खाशीं संबंध पाडूं नये, अंधारीं हात घालूं नये,
दुश्चितपणें विसरूं नये, वस्तु आपुली.　　　३३
स्नानसंध्या सांडूं नये, कुलाचार खंडूं नये,
अनाचार मांडूं नये, चुकुरपणें.　　　३४
हरिकथा सांडूं नये, निरूपण तोडूं नये,
परमार्थास मोडूं नये, प्रपंचबळें.　　　३५
देवाचा नवस बुडवूं नये, आपला धर्म उडवूं नये,
भलते भरीं भरूं नये, विचारेंविण.　　　३६
निष्ठुरपण धरूं नये, जीवहत्या करूं नये,
पाऊस देखोन जाऊं नये, अथवा अवकाळीं.　　　३७
सभा देखोनि गळूं नये, समयीं उत्तर टळूं नये,
धिक्कारितां चळूं नये, धारिष्ट आपुलें.　　　३८
सत्यमार्ग सांडूं नये, असत्य पंथें जाऊं नये,
कदा अभिमान घेऊं नये, असत्याचा.　　　३९
अपकीर्ति ते सांडावी, सत्कीर्ति वाढवावी,
विवेकें दृढ धरावी, वाट सत्याची.　　　४०
न घेतां हे उत्तम गुण, ते मनुष्य अवलक्षण,
ऐक तयांचें लक्षण, पुढिल समासीं.　　　४१

दशक २, समास २.

---

## करंटकलक्षण.

सुचित करूनि अंतःकरण, ऐका करंटलक्षण,
हें त्यागितां सदैवलक्षण, आंगीं बाणे. १
पापाकारितां दरिद्र प्राप्त, दरिद्रें होय पाप संचित,
ऐसेंचि होत जात, क्षणक्षणा. २
याकारणें करंटलक्षणें, ऐकोनि त्यागचि करणें,
ह्मणजे कांहींएक बाणे, सदैवलक्षण. ३
करंट्यास आळस आवडे, यत्न कदापि नावडे,
त्याची वासना वावडे, अधर्मीं सदा. ४
सदा भ्रमिष्ठ निदसुरा, उगेंचि बोले सैरावैरा,
कोणीएकाच्या अंतरा, मानेचि ना. ५
लिहूं नेणे वाचूं नेणे, सवदासूत वेऊं नेणे,
हिशेबकितेब राखों नेणे, धोरण नाहीं. ६
हारवी सांडी पाडी फोडी, विसरे चुके नाना खोडी,
भल्याचे संगतीची गोडी, कदापि नाहीं. ७
चाट गडी मेळविले, कुकर्मी मित्र केले,
खट नट एकवटिले, चोरटे पापी. ८
ज्यासीं त्यासीं कळकटा, स्वयें सदाचा चोरटा,
परघातकी धाटामोटा, वाटा पाडी. ९
दीर्घसूचना सुचेचिना, न्याय नीति हे रुचेना,
पराभिलाषीं वासना, निरंतर. १०
आळसें शरीर पाळी, अखंड कुशी कांडोळी,
निद्रेचे पाडी सुकाळीं, आपणासीं. ११

आळसें शरीर पाळिलें, परंतु पोटाविण गेलें,
सुडकें मिळेनासें झालें, पांघरायासी. १२
जनांसी मैत्री करीना, कठिण शब्द बोले नाना,
मूर्खपणें आवरेना, कोणीएकासी. १३
पवित्र लोकांमध्यें भिडावे, ओंगळांमध्यें निःशंक धांवे,
सदा मनापासून भावे, जननिंद्य क्रिया. १४
तेथें कैचा परोपकार, केला बहुतांचा संहार,
पापी अनर्थी अपस्मार, सर्व अबुद्धि. १५
शब्द सांभाळून बोलेना, आवरितां आवरेना,
कोणीएकासि मानेना, बोलणें त्याचें. १६
कोणीएकासि विश्वास नाहीं, कोणीएकासी सख्य नाहीं,
विद्यावैभव कांहींच नाहीं, उगाचि ताठा. १७
राखावीं बहुतांचीं अंतरें, भाग्य येतें तदनंतरें,
ऐसीं हे विवेकाचीं उत्तरें, ऐकणार नाहीं. १८
स्वयें आपणासि कळेना, शिकविलें तें ऐकेना,
तयासी उपाय नाना, काय करिती ! १९
कल्पना करी उदंड कांहीं, प्राप्तव्य तों कांहींच नाहीं !
अखंड पडला संदेहीं, अनुमानाचे. २०
पुण्यमार्ग सांडिला मनें, पाप झडावें काशानें ?
निश्चय नाहीं अनुमानें, नाश केला. २१
कांहींएक पुरतें कळेना, सभेमध्यें बोलों राहेना,
बाष्कळ लबाड ऐसे जना, कळों आलें. २२

कांहीं नेमकपण आपुलें, बहुतजनांसी कळों आलें,
तेंचि मनुष्य मान्य झालें, भूमंडळीं. २३
झिजल्यावांचूनि कीर्ति कैंची ? मान्यता नव्हे कीं फुकाची !
जिकडेतिकडे होते चीं-चीं, अवलक्षणें. २४
भल्याची संगती धरीना, आपणांस शहाणें करीना.
तो आपला आपण वैरी जाणा, स्वहित नेणे. २५
लोकांसी बरें करावें, तें उसणें सर्वेचि घ्यावें,
ऐसें जयाच्या जीवें, जाणिजेना. २६
जेथें नाहीं उत्तम गुण, तें करंटपणाचें लक्षण,
बहुतांसि न माने तें अवलक्षण, सहजचि झालें. २७
कार्याकारण सकळ कांहीं, कार्याविण तो कांहींच नाहीं,
निकामी तो दुःखप्रवाहीं, वाहातचि गेला. २८
बहुतांसीं मान्य थोडा, त्याच्या पापास नाहीं जोडा,
निराश्रयी पडे उघडा, जेथेंतेथें. २९
याकारणें अवगुण त्यागावे, उत्तमगुण समजोनि घ्यावे,
तेणें मनासारिखें फावे, सकळ कांहीं. ३०

दशक १९ समास ३.

---

## सदैवलक्षण.

मागां बोलिलें करंटलक्षण, तें विवेकें सांडावें संपूर्ण,
आतां ऐका सदैवलक्षण, सौख्यदायक. १
उपजत गुण शरीरीं, परोपकारी नानापरी,
आवडे सर्वांचें अंतरीं, सर्वकाळ. २

सुंदर अक्षर लिहों जाणे, चपळ शुद्ध वाचूं जाणे,
अर्थांतर सांगों जाणे, सकळ कांहीं. ३
कोणाचें मनोगत तोडीना, भल्याची संगती सोडीना,
सदैवलक्षण अनुमाना, आणून ठेवी. ४
तो सकळ जनासी व्हावा, जेथें तेथें नित्य नवा,
मूर्खपणें अनुमानगोवा, कांहींच नाहीं. ५
नाना उत्तम गुण सत्पात्र, तेचि मनुष्य जगमित्र,
प्रकट कीर्ती स्वतंत्र, पराधीन नाहीं. ६
राखे सकळांचें अंतर, उदंड करी पाठांतर,
नेमस्तपणाचा विसर, पडणार नाहीं. ७
नम्रपणें पुसों जाणे, नेमस्त अर्थ सांगों जाणे,
बोला ऐसें वर्तों जाणे, उत्तम क्रिया. ८
जो मानला बहुतांसी, कोणी बोलों न शके त्यासी,
धगधगीत पुण्यराशी, महापुरुष. ९
जो परोपकार करितचि गेला, पाहिजे जो ज्यालात्याला,
मग काय उणें तयाला, भूमंडळीं. १०
बहुत जन वास पाहे, वेळेसी तत्काळ उभा राहे,
उणें कोणाचें न साहे, तया पुरुषासी. ११
सकळांसी नम्र बोलणें, मनोगत राखोन चालणें,
अखंड कोणीएकाचें उणें, पडोंच नेदी. १२
न्याय नीति भजन मर्यादा, काळ सार्थक करी सदा,
दरिद्रपणाची आपदा, तेथें कैंची. १३
उत्तम गुणें शृंगारला, तो बहुतांमधें शोभला,
प्रगट प्रतापें उगवला, मार्तंड जैसा. १४

जाणता पुरुष असेल जेथें, कलह कैंचा उठेल तेथें ?
उत्तम गुणाविषयीं रिते, ते प्राणी करंटे. १५
प्रपंचीं जाणे राजकारण, परमार्थीं साकल्य विवरण,
सर्वांमधें उत्तम गुण, त्याचा भोक्ता. १६
मागें एक पुढें एक, ऐसा कदापि नाहीं दंडक,
सर्वत्रांसि अलौकिक, तया पुरुषाची. १७
अंतरासी लागेल ढका, ऐसी वर्तणूक करूं नका,
जेथेंतेथें विवेका, प्रगट करी. १८
पाहातां अवघे उत्तम गुण, तयासी वाईट ह्मणेल कोण ?
जैसा आत्मा संपूर्ण, सर्वां घटीं. १९
आपल्या कार्यास तत्पर, लोक असती लहानथोर,
तैसाचि करी परोकार, मनापासुनी. २०
दुसऱ्याच्या दुःखें दुःखावे, दुसऱ्याच्या सुखें सुखावे,
अवघेचि सुखी असावे, ऐसी वासना. २१
उत्तम गुणास मनुष्य वेधे, वाईट गुणासि प्राणी खेदे,
तीक्ष्णबुद्धी लोक साधे, काय जाणती. २४
बहुतांसी वाटे मी थोर, सर्वमान्य पाहिजे विचार,
धीर उदार गंभीर, महापुरुष. २५
जितुके कांहीं उत्तम गुण, तें समर्थाचें लक्षण,
अवगुण तें करंटलक्षण, सहजचि झालें. २६

दशक १९ समास ४.

## दुश्चितलक्षण.

अर्थ प्रमेय ग्रंथांतरीं, शोधून घ्यावें अभ्यंतरीं,
दुश्चितपण आलें तरी, पुनः श्रवण करावें. १
अर्थांतर पाहिल्याविण, उगाच करी जो श्रवण,
श्रोता नव्हे पाषाण, मनुष्यवेषें ! २
वांकुडातिकडा फोडिला, पाषाण घडून नीट केला,
दुसरे वेळेसी पाहिला, तरी तो तैसाचि असे ! ३
टाकीनें खपली फोडिली, ते मागुती नाहीं जडली.
मनुष्याची कुबुद्धि झाडिली, तरी ते पुन्हा लागे. ४
सांगतां अवगुण गेला, पुनः मागुता जडला,
याकारणें महाभला, पाषाणगोटा. ५
ज्याचा अवगुण झडेना, तो पाषाणाहून उणा,
पाषाण आगळा जाणा, कोटिगुणें. ६
कोटिगुणें कैसा पाषाण, त्याचेंही ऐका लक्षण,
श्रोतीं करावें श्रवण, सावध होउनी. ७
माणीक मोतीं प्रवाळ, पाच वैडूर्य वज्रनीळ,
गोमेदमणी परिस केवळ, पाषाण बोलिजे. ८
याहीवेगळे बहुत, सूर्यकांत, सोमकांत.
नाना मोहरे सप्रचीत, औषधाकारणें. ९
याही वेगळे पाषाण भले, नाना तीर्थीं जे लागले,
वापीकूप शेखीं झाले, हरिहरमूर्ति. १०
याचा पाहतां विचार, पाषाणाऐसें नाहीं सार,
मनुष्य तें काय पामर, पाषाणापुढें ! ११
तरी तो ऐसा नव्हे पाषाण, जो अपवित्र निष्कारण.
तयासारिखा देह जाण, दुश्चीत अभक्तांचा. १२

दशक ८, समास ६.

## दुश्चितपण.

आतां असो हें बोलणें, घात होतो दुश्चितपणें,
दुश्चितपणाचेनि गुणें, प्रपंच ना परमार्थ. १
दुश्चितपणें कार्य नासे, दुश्चितपणें चिंता वसे,
दुश्चितपणें स्मरण नसे, क्षणएक पाहतां. २
दुश्चितपणें शत्रुजिणें, दुश्चितपणें जन्ममरणें,
दुश्चितपणाचेनि गुणें, हानी होय. ३
दुश्चितपणें नव्हे साधन, दुश्चितपणें न घडे भजन,
दुश्चितपणें नव्हे ज्ञान, साधकांसी. ४
दुश्चितपणें नव्हे निश्चय, दुश्चितपणें न घडे जय,
दुश्चितपणें होय क्षय, आपुल्या स्वहिताचा. ५
दुश्चितपणें बैसलाच दिसे, परी तो असताचि नसे,
चंचळ चक्रीं पडिलें असे, मानस तयाचें. ६
सावध असोनि उमजेना, श्रवण असोनि ऐकेना,
ज्ञान असोनि कळेना, सारासार विचार. ७
ऐसा जो दुश्चित आळसी, सौख्य कैचें तयासी ?
जयाचे जीवीं अहर्निशीं, आळस वसे. ८

दशक ८, समास ६.

---

## आळस.

दुश्चितपणापासून सुटला, तरी तो सवेंचि आळस आला,
आळसा हातीं प्राणियाला, उसंताचि नाहीं. १
आळसें राहिला विचार, आळसें बुडाला आचार,
आळसें नव्हे पाठांतर, कांहींकेल्या. २

आळसें घडेना श्रवण, आळसें नव्हे निरूपण,
आळसें परमार्थाची खूण, माळिण झाली. ३
आळसें नित्यनेम राहिला, आळसें अभ्यास बुडाला,
आळसें आळस वाढला, असंभाव्य. ४
आळसें गेली धारणा धृति, आळसें मळिण झाली वृत्ति,
आळसें विवेकाची गति, मंद जाहली. ५
आळसें निद्रा वाढली, आळसें वासना विस्तारली,
आळसें शून्याकार झाली, सद्बुद्धि निश्चयाची. ६
दुश्चितपणासवें आळस, आळसें निद्राविलास,
निद्राविलासें केवळ नाश, आयुष्याचा. ७

दशक ८, समास ६.

---

## निद्रा, आळस व दुश्चितपण.

निद्रा आळस दुश्चितपण, हेंचि मूर्खाचें लक्षण,
येणेंकरितां निरूपण, उमजेचिना. १
क्षुधा लागतांच जेविला, जेवून उठतां आळस आला,
आळस येतां निजेला, सावकाश. २
निजोनि उठतांचि दुश्चित, कदा नाहीं सावचित,
तेथें कैचें आत्महित, निरूपणीं. ३
मर्कटापाशीं दिलें रत्न, पिशाचाहातीं निधान,
दुश्चितापुढें निरूपण, तयापरी होय ! ४

दशक ८ समास ६.

---

## लेखन.

— — — अक्षर, घडसून करावें सुंदर,
जें देखतांच चतुर, समाधान पावती. १
वाटोळें सरळ मोकळें, ओतलें मसीचें काळें,
कुळकुळित ओळी चालल्या ढाळें, मुक्तामाळा जैशा. २
अक्षरमात्र तितुकें नीट, नेमस्त पैस काने नीट,
आडव्या मात्र त्याही नीट, आर्कुलीं वेलांट्यां. ३
पहिलें अक्षर जें काढिलें, ग्रंथ संपेतों पाहत गेलें,
एका टाकेंचि लिहिलें ! ऐसें वाटे. ४
ओळीस ओळी लागेना, आर्कुली मात्रा भेदीना,
खालील ओळीस स्पर्शेना, अथवा लंबाक्षर. ५
पान शिशानें रेखाटावें, त्यावरी नेमकेंचि लिहावें,
दुरी जवळी न व्हावें, अंतर ओळीचें. ६
कोठें शोधासी अडेना, चुकी पाहतां सांपडेना,
गरज केली हें घडेना, लेखकापासूनी. ७
ज्याचें वय आहे नूतन, त्यानें लिहावें जपून,
जनांस पडे मोहन, ऐसें करावें. ८
बहु बारिक तरुणपणीं, कामा नये ज्ञातारपणीं,
मध्यस्त लिहिण्याची करणी, केली पाहिजे. ९
भोवतें स्थळ सोडून द्यावें, मध्यें चमचमीत लिहावें,
कागद झडतांहि झडावें, नलगेचि अक्षर. १०
काया बहुत कष्टवावी, उत्कट कीर्ति उरवावी,
चटक लावून सोडावी, कांहींएक. ११

दशक १९, समास १.

## गोड भाषण.

बरें बोलतां सुख वाटतें, हें तों प्रत्यक्ष कळतें,
आत्मवत् परावें तें मानीत जावें. १
कठिण शब्दें वाईट वाटतें, हें तों प्रत्ययास येतें,
तरीमग वाईट बोलावें तें, काय निमित्त ? २
आपणासि चिमटा घेतला, तेणें कासाविस झाला,
आपणावरून दुसऱ्याला, राखीत जावें. ३
जे दुसऱ्यास दुःख करी, ते अपवित्र वैखरी,
आपणास घात करी, कोणीएके प्रसंगीं. ४
पेरिलें तें उगवतें, बोलण्यासारखें उत्तर येतें,
तरीमग कर्कश बोलावें तें, काय निमित्त ? ५

दशक १२, समास १०.

---

## अभिमान.

अभिमानें उठे मत्सर, मत्सरें ये तिरस्कार,
पुढें क्रोधाचा विकार, प्रबळे बळें. १
ऐसा अंतरीं नासला, कामक्रोधें खवळला,
अहंभावें पालटला, प्रत्यक्ष दिसे. २
कामक्रोधें लिथाडला, तो कैसा ह्मणावा भला ?
अमृत सेवितांच पावला, मृत्यु राहू. ३
आतां असो हें बोलणें, अधिकारासारखें घेणें,
परंतु अभिमान त्यागणें, हें उत्तमोत्तम. ४

दशक १, समास १.

---

## गुणमहिमा.

पृथ्वीमध्यें लोक सकळ, एक संपन्न, एक दुर्बळ,
एक निर्मळ एक ओंगळ, काय निमित्तें ? १
कित्येक राजे नांदती, कित्येक दरिद्र भोगती,
कितीएकांची उत्तम स्थिती, कित्येक अधमाधम. २
ऐसें काय निमित्त झालें, हें मज पाहिजे निरूपिलें,
याचें उत्तर ऐकिलें, पाहिजे श्रोतीं. ३
हे सकळ गुणापाशीं गति, सगुण भाग्यश्री भोगिती,
अवगुणास दरिद्रप्राप्ती, यदर्थीं संदेह नाहीं. ४
जो जो जेथें उपजला, तो ते व्यवसायीं उमजला,
तयास लोक ह्मणती भला, कार्यकर्ता. ५
जाणता तो कार्य करी, नेणता कांहींच न करी,
जाणता तो पोट भरी, नेणता भीक मागे. ६
हें तो प्रगटाचि असे, जनीं पाहतां प्रत्यक्ष दिसे,
विद्येवीण करंट वसे, विद्या तो भाग्यवंत. ७
आपुली विद्या न शिकसी, तरी काय भीक मागसी,
जेथें तेथें बुद्धि ऐसी, वडिलें सांगती. ८
वडील आहे करंटा, आणि समर्थ होय धाकुटा,
कां जे विद्येनें मोठा, ह्मणूनियां. ९
विद्या नाहीं बुद्धि नाहीं, विवेक नाहीं साक्षेप नाहीं,
कुशलता नाहीं, व्याप नाहीं, ह्मणोनि प्राणी करंटा. १०
इतुकेंही जेथें वसे, तेथें वैभवास उणें नसे,
वैभव सांडितां, आपैसें पाठीं लागे. ११

वडील समर्थ धाकटा भिकारी, ऐका याची कैसी परी,
वडिलाऐसा व्याप न करी, ह्मणोनियां. १२
जैसी विद्या तैसी हांव, जैसा व्याप तैसें वैभव.
तोलासारिखा हावभाव, लोक करिती. १३
विद्या नसे वैभव नसे, तेथें निर्मळ कैचा असे,
करंटपणें ओखटा दिसे, ओंगळ आणि विकार. १४
पशु पक्षी गुणवंत, त्यास कृपा करी समर्थ,
गुण नसतां जिणें व्यर्थ, प्राणिमात्रांचें. १५
गुण नाहीं गौरव नाहीं, सामर्थ्य नाहीं महत्त्व नाहीं,
कुशलता नाहीं तर्क नाहीं, प्राणिमात्रांसी. १६
याकारणें उत्तम गुण, तेंचि भाग्याचें लक्षण,
लक्षणेंविण अवलक्षण, सहजचि झालें. १७

दशक ९; समास. ४.

---

## जाणतेपण.

जनामध्यें जो जाणता, त्यास आहे मान्यता,
कोणीएक विद्या असतां, महत्त्व पावे. १
प्रपंच अथवा परमार्थ, जाणता तोच समर्थ,
नेणता जाणिजे व्यर्थ, निष्कारण. २
नेणतां प्राणी सिंतरे, नेणपणें तऱ्हे भरे,
नेणपणें ठके विसरे, पदार्थ कांहीं. ३
नेणतां वैरी जिंकिती, नेणतां अपायीं पडती,
नेणतां संहारिती घडती, जीवनाश. ४

आपुलें स्वहित न कळे जना, तेणें भोगिती यातना,
ज्ञान नेणतां अज्ञाना, अधोगती. ५
जाणतां समर्थाचें अंतर, प्रसंगें वर्ते तदनंतर,
भाग्यवैभव अपार, तेणेंचि पावे. ६
ह्मणोनि जाणणें नव्हे सामान्य, जाणतां होइजे सर्वमान्य,
कांहींच नेणतां अमान्य, सर्वत्र करिती. ७
पदार्थ देखोनि भूत भावी, नेणतें झडपोनी प्राणी ठेवी,
मिथ्या आहे उठाठेवी, जाणते जाणती. ८
जाणत्यास कळे वर्म, नेणत्याचें खोटें कर्म,
सकळ कांहीं धर्माधर्म, जाणतया कळे. ९
नेणत्यास यमयातना, जाणत्यास कांहींच लागेना,
सकळ जाणोन विवंचना, करी तो मुक्त. १०
ह्मणोनियां नेणणें खोटें, नेणते प्राणी ते करंटे,
जाणतां विवरतां तुटे, जन्ममरण. ११
ह्मणोनि अलक्ष करूं नये, जाणणें हाचि उपाय,
जाणतां सांपडे सोय, परलोकाची. १२
जाणणें ह्मणजे स्मरण, नेणणें ह्मणजे विस्मरण,
दोहींमधें कोण प्रमाण, शाहाणे जाणती. १३
जाणते लोक ते शहाणें, नेणते वेडे दैन्यवाणे,
विज्ञान तेंही जाणपणें, कळों आलें. १४

दशक ९, समास. ४.

## जाणत्याची संगती.

नेणपणें झालें तें झालें, झालें तें होऊन गेलें,
जाणतेपणें वर्तलें, पाहिजे नेमस्त. १
जाणत्याची संगती धरावी, जाणत्याची सेवा करावी,
जाणत्याची सद्‌बुद्धि घ्यावी, हळूहळू. २
जाणत्यापाशीं लिहों शिकावें, जाणत्यापाशीं वाचूं शिकावें,
जाणत्यापाशीं पुसावें, सकळ कांहीं. ३
जाणत्यास करावा उपकार, जाणत्यास झिजवावें शरीर,
जाणत्याचा पाहावा विचार, कैसा आहे. ४
जाणत्याचे संगतीनें भजावें, जाणत्याचे संगतीनें झिजावें,
जाणत्याचे संगतीनें रिझावें, विवरविवरों. ५
जाणत्याच्या कासेसी लागावें, जाणत्याचें औषध घ्यावें,
जाणता सांगेल तें करावें, पथ्य आधीं. ६
जाणत्यापाशीं परीक्षा शिकणें, जाणत्यापाशीं तालीम करणें,
जाणत्यापाशीं पोहणें, अभ्यासावें. ७
जाणता बोलेल तैसें बोलावें,जाणता सांगेल तैसें चालावें,
जाणत्याचें ध्यान घ्यावें, नाना प्रकारीं. ८
जाणत्याचे पेंच जाणावे, जाणत्याचे पीळ उकलावे,
जाणता राखेल तैसे राखावे, लोक राजी. ९
जाणत्याचे जाणावे प्रसंग, जाणत्याचे घ्यावे रंग,
जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग, अभ्यासावे. १०
जाणत्याचा साक्षेप घ्यावा, जाणत्याचा तर्क जाणावा,
जाणत्याचा उल्लेख समजावा, न बोलतांचि. ११

जाणत्याचें धूर्तपण, जाणत्याचें राजकारण,
जाणत्याचें निरूपण, ऐकत जावें. १२
जाणत्याचीं कवित्वें शिकावीं, गद्यें पद्यें ओळखावीं,
माधुर्यवचनें समजावीं, अंतर्यामीं. १३
जाणत्याचे पाहावे प्रबंध, जाणत्याचे वचनभेद,
जाणत्याचे नाना संवाद, बरे शोधावे. १४
जाणत्याची नाना कल्पना, जाणत्याची दीर्घ सूचना,
जाणत्याची विवंचना, समजोनि घ्यावी. १५
जाणत्याचें पहावें ज्ञान, जाणत्याचें शिकावें ध्यान,
जाणत्याचें सूक्ष्म चिन्ह, समजोनि घ्यावें. १६
जाणत्याचा काळ सार्थक, जाणत्याचा अध्यात्मविवेक,
जाणत्याचे गुण अनेक, अवघेच घ्यावे. १७
परमेश्वराचे गुणानुवाद, अखंड करावा संवाद,
तेणेंकरितां आनंद, उदंड होतो. १८
परमेश्वरें निर्मिलें तें, अखंड दृष्टीस पडतें,
विवरविवरों समजावें तें, विवेकी जनीं, १९
जो निर्माण करितो जना, परी पाहों जातां दिसेना,
विवेकबळें अनुमाना, आणीत जावें. २०
त्याचें अखंड लागतां ध्यान, कृपाळुपणें देतो आशन,
सर्वकाळ संभाषण, तदंशेंचि करावें. २१

दशक १८ समास, २.

## शहाणपणाची महती.

जेथें उदंड जाणीव, तेचि तितुके सदैव,
थोडे जाणिवेनें निदैव, होती लोक. १
व्याप आटोप करिती, धक्के चपेटे सोशिती,
तेणें प्राणी सदैव होती, देखत देखतां. २
ऐसें हें आतां वर्ततें, मूर्ख लोकांस कळेना तें,
विवेकी मनुष्य समजतें, सकळ कांहीं. ३
थोर लहान बुद्धीपाशीं, सगट कळेना लोकांशीं,
आधीं उपजलें तयाशीं, थोर ह्मणती. ४
गुणेंविण वडिलपण, हें तों अवघेंच अप्रमाण,
त्याची प्रचीत प्रमाण, थोरपणीं. ५
तथापि वडिलांस मानावें, वडिलें वडिलपण जाणावें,
नेणतां पुढें कष्टावें, थोरपणीं. ६
याकारणें कोणीएकें, शहाणपण शिकावें विवेकें,
विवेक न शिकतां तुकें, तुटोनि जाती. ७
तुक तुटलें ह्मणजे गेलें, जन्मा येऊनि काय केलें,
बळेंचि सांदीस घातलें, आपणासी. ८
सगट बायका शिव्या देती, सांदीस पडला ऐसें ह्मणती,
मूर्खपणाची प्राप्ती, टाकून आली. ९
ऐसें कोणीएकें न करावें, सर्व सार्थकाचि करावें.
कळेना तरी विवरावें, ग्रंथांतरीं. १०
शहाण्यास कोणीतरी पहाती, मूर्खास लोक दवडूनि देती,
जीवास आवडे संपत्ती, तरी शहाणें व्हावें. ११

अहो ! या शहाणपणाकारणें, बहुतांचे कष्ट करणें,
परंतु शहाणपण शिकणें, हें उत्तमोत्तम. १२
जो बहुतांस मानला, तो जाणावा शहाणा झाला,
जनीं शहाण्या मनुष्याला, काय उणें ? १३
आपलें हित न करी लौकिकीं, तो जाणावा आत्मघातकी,
या मूर्खाएवढा पातकी, आणिक नाहीं ! १४
आपण संसारीं कष्टतो, लोकांकरवीं रागेजोनि घेतो,
जनांमध्यें शहाणा तो, ऐसें न करी. १५
साधकां शिकविलें स्वभावें, मानेल तरी सुख घ्यावें,
मानेना तरी सांडावें, एकीकडे. १६
तुह्मी श्रोते परम दक्ष, अलक्षास लावितां लक्ष,
हें तों सामान्य प्रत्यक्ष, जाणतसां. १७
दशक १५, समास १.

---

## सत्संगती.

ज्यास स्वहिताचि करणें, त्यास किती ह्मणोनि सांगणें !
हें ज्याचें त्याणें समजणें, सकळ कांहीं. १
आपला आपण करी कुडावा, तो आपला मित्र जाणावा,
आपला नाश करी तो समजावा, वैरी ऐसा. २
आपलें आपण अहित करावें, त्यास आडवें कोणीं निघावें,
एकांतीं जाऊनि जीवें, मारी आपणासी. ३
जो आपला आपण घातकी, तो आत्महत्यारा पातकी,
याकारणें विवेकी, धन्य साधु. ४

पुण्यवंता सत्संगती, पापिष्टां असत्संगती,
गति आणि अवगती, संगतीयोगें. ५
उत्तम संगती धरावी, आपली आपण चिंता करावी,
अंतरीं बरी विवरावी, बुद्धि जाणत्याची. ६
जाणता तो सकळां मान्य, नेणता होतो अपमान्य,
जेणेंकरितां होइजे धन्य, तेंचि घ्यावें. ७
जाणता देवाचा अंश, नेणता ह्मणजे तो राक्षस,
यामध्यें जें विशेष, तें जाणोन घ्यावें. ८
साक्षेपी शहाण्याची संगती, तेणें साक्षेपी शहाणे होती,
आळशी मूर्खाची संगती, आळशी मूर्ख. ९
उत्तम संगतीचें फळ सुख, अधम संगतीचें फळ दुःख.
आनंद सांडूनियां शोक, कैसा घ्यावा ! १०
ऐसें हें प्रगट दिसे, जनांमधें उदंड भासे,
प्राणीमात्र वर्तत असे, उभययोगें. ११
नाना दुर्जनांचा संग, क्षणक्षणा मनभंग,
याकारणें कांहीं रंग, राखोनि जावें. १२
शहाणा यत्न त्याच्या गुणें, पाहों जातां काय उणें,
सुख संतोष भोगणें, नाना श्लाघ्यता. १३
देहें जैसें केलें तैसें होतें, यत्न केल्या कार्य साधतें,
तरी मग कष्टावें तें, काय निमित्त ? १४

दशक १७, समास ७.

[ २ ]

आधीं राखावा आचार, मग पाहावा विचार,
आचार विचारें पैलपार; पाविजे तो. १५
अमृत विष एक ह्मणती, परी विष घेतां प्राणी जाती,
कुकर्मे होते फजिती, सत्कर्मे कीर्ति वाढे. १६
ह्मणूनि संतसंगेंचि जावें, सच्छास्त्रचि श्रवण करावें,
उत्तम गुणास अभ्यासावें, नाना प्रयत्नें. १७

दशक १७, समास १०.

# भाग २ रा.

## व्यवहारप्रकरण.

### गृहस्थाश्रम.

नरदेहीं गृहस्थाश्रम, सकळांमधें उत्तमोत्तम,
परंतु पाहिजे स्वधर्म, आणि भूतदया. १
जेथें षट्कर्मैं चालती, विधियुक्त क्रिया आचरती,
वाङ्माधुर्यें बोलती, प्राणिमात्रांशीं. २
सर्वप्रकारें नेमक, शास्त्रोक्त करणें कांहींएक,
त्याहीमधें अलौकिक, भक्तिमार्ग. ३
पुरश्चरणीं काया क्लेशी, दृढ वृत्ती परम सायासी,
जगदीशावेगळें जयासीं, थोर नाहीं. ४
वेडें संसार सांडूनि गेलें, तरी तें कष्टकष्टोंचि मेलें,
दोहींकडे अंतरलें, इहलोक परत्र. ५
रागें रागें निघोनि गेला, तरी तो भांडभांडोंचि मेला.
बहुत लोक कष्टी केला, आपणही कष्टी. ६
निघोनि गेला परी अज्ञान, त्याचे संगती लागले जन,
गुरुशिष्य दोघे समान, अज्ञानरूपें. ७
गृहीं पोटेंवीण कष्टती, कष्टी होऊनि निघोनि जाती,
त्यास ठायीं ठायीं मारिती, चोरी भरतां. ८
एके संगतीनें तरती, एके संगतीनें बुडती,
याकारणें सत्संगती, बरी पाहावी. ९

आशाबद्ध अनाचारी, निघोनि गेला देशांतरीं,
तरी तो अनाचारचि करी, जनांमध्यें. १०
संसार मिथ्या ऐसा कळला, ज्ञान समजोनि निघोनि गेला,
तेणें जन पावन केला, आपणा ऐसा. ११
जो दुसऱ्याचें अंतर जाणे, देश काळ प्रसंग जाणे,
तया पुरुषा काय उणें, भूमंडळीं ! १२

दशक १४, समास ७.

---

## नित्यक्रम.

बहुतां जन्माचा शेवट, नरदेह सांपडे अवचट,
येथें वर्तावें चोखट, नीतिन्यायें. १
पुण्यमार्ग अवघा बुडाला, पापसंग्रह उदंड झाला,
यमयातनेचा झोला, कठीण आहे. २
आळसाचें फळ रोकडें, जांभया देऊनि निद्रा पडे,
सुख ह्मणोनि आवडे, आळशी लोकां. ३
सांक्षेप करतां कष्टती, परंतु पुढें सुरवाडती,
खाती जेवती सुखी होती, यत्नेंकरूनी. ४
आळस उदास नागवणा, आळस प्रयत्न बुडवणा,
आळसें करंटपणाच्या खुणा, प्रगट होती. ५
ह्मणूनि आळस नसावा, तरीच पाविजे वैभवा,
अत्रीं परत्रीं जीवा, समाधान. ६
प्रातःकाळीं उठावें, कांहीं पाठांतर करावें,
यथानुशक्ति आठवावें, सर्वोत्तमासी. ७

मग दिशेकडे जावें, शौच आचमन करावें,
मुखमार्जन स्नान करावें, निर्मळ जळें. ८
ज्या ज्याचा जो व्यापार, तेथें असावें खबरदार,
दुश्चितपणें तरी पोर, वेढा लावी. ९
चुके ठके विसरे सांडी, आठवण झालिया चरफडी,
दुश्चित आळसाची रोकडी, प्रचीत पाहा. १०
याकारणें सावधान, एकाग्र असावें मन,
तरी मग जेवितां भोजन, गोड वाटे. ११
पुढें भोजन झालियावरी, कांहीं वाचा चर्चा करी,
एकांतीं जाऊन विवरी, नाना ग्रंथ. १२
तरीच प्राणी शहाणा होतो, नाहींतरी मूर्खचि राहतो,
लोक खाती आपण पाहतो, दैन्यवाणा. १३
एक सदैवपणाचें लक्षण, रिकामा जाऊं नेदी क्षण,
प्रपंचव्यवसायाचें ज्ञान, बरें पाहे. १४
कांहीं मेळवी मग जेवी, गुंतल्या लोकांस उगवी,
शरीर कारणीं लावी, कांहींतरी. १५
ऐसा जो सर्वसावध, त्यास कैंचा असेल खेद ?
विवेकें तुटला संबंध, देहबुद्धीचा. १६

दशक ११, समास ३.

---

## शिकवण.

ऐका संसारासी आले हो, स्त्री पुरुष निस्पृह हो,
सुचितपणें पाहो, अर्थांतर. १
काय ह्मणते वासना, काय कल्पिते कल्पना,
अंतरींचे तरंग नाना-, प्रकारें उठती. २
बरें खावें, बरें जेवावें, बरें ल्यावें बरें नेसावें,
मनासारखें असावें, सकळ कांहीं. ३
ऐसें आहे मनोगत, तरी तें कांहींच न होत,
बरें करतां अकस्मात, वाईट होतें. ४
एक सुखी एक दुःखी, प्रत्यक्ष वर्तत लोकीं,
कष्टी होऊनियां शेखीं, प्रारब्धावरी घालिती. ५
अचूक यत्न करवेना, ह्मणोनि केलें तें सजेना,
आपला अवगुण जाणवेना, कांहींकेल्या. ६
जो आपला आपण नेणे, तो दुसऱ्याचें काय जाणे ?
न्याय सांडितां दैन्यवाणे, होती लोक. ७
लोकांचें मनोगत कळेना, लोकांसारखें वर्तवेना,
मूर्खपणें लोकीं नाना, कलह उठती. ८
मग ते कलह वाढती, परस्परें कष्टी होतीं,
प्रयत्न राहतां अंतीं, श्रमचि होय. ९
ऐशी नव्हे वर्तणुक, परीक्षावे नाना लोक,
समजलें पाहिजे नेमक, ज्याचें त्यापरी. १०
दुसऱ्यास शब्द ठेवणें, आपला कैपक्ष घेणें,
पाहूं जातां लौकिक लक्षणें, बहुतेक ऐसीं. ११

लोकीं बरें ह्मणायाकारणें, भल्यांस लागतें सोसणें,
न सोसितां भंडवाणें, सहजचि होय. १२
बोलतो खरें चालतो खरें, त्यास मिळती लहानथोरें,
न्याय अन्याय परस्परें, सहजचि कळे. १३
लोकांस कळेना तंववरी, विवेकें क्षमा जो न करी,
तेणेंकरितां बराबरी, होत जाते. १४
जोंवरी चंदन झिजेना, तंव तो सुगंध कळेना,
चंदन आणि वृक्ष नाना, सगट होती. १५
जंव उत्तम गुण न कळे, तों या जनांस काय कळे,
उत्तम गुण देखतां निवळे, जगदंतर. १६
जगदंतर निवळत गेलें, जगदंतरीं सख्य झालें,
मग जाणावे ओळले, विश्वजन. १७
जनीं जनार्दन वोळला, तरी काय उणें तयाला,
राजी राखावें सकळांला, कठीण आहे. १८
पेरिलें तें उगवतें, उसणें द्यावें ध्यावें लागतें,
वर्म काढतां भंगतें, परांतर. १९
लौकिकीं बरेपण केलें, तेणें सौख्य वाढलें,
उत्तरासारिखें आलें, प्रत्युत्तर. २०
हें आवघें आपणापाशीं, तेथें बोल नाहीं जनासी,
शिकवावें आपल्या मनासी, क्षणक्षणा. २१
खळ दुर्जन भेटला, क्षमेचा धीर बुडाला,
तरी मौनेंच स्थळत्याग केला, पाहिजे साधकें. २२

लोक नाना परीक्षा जाणती, परी अंतरपरीक्षा नेणती,
तेणें प्राणी करंटे होती, संदेह नाहीं. २३
थोर लहान समान, आपले पारिखे सकल जन,
चढतें वाढतें संनिधान, करितां बरें. २४
बरें करतां बरें होतें, हें तों प्रत्ययास येतें,
आतां पुढें सांगावें तें, कोणास काय ? २५
विद्या उदंडची शिकला, प्रसंगमान चुकत गेला,
तरी मग तये विद्येलां, कोण पुसे ? २६

दशक १२, समास २.

[ २ ]

विवेकहीन जे जन, ते जाणावे पशुसमान,
त्यांचें ऐकतां भाषण, परलोक कैंचा ? २७
कीर्ति करून नाहीं मेले, ते उगीच आले आणि गेले !
शहाणे होऊन भुलले, काय सांगावें ? २८

दशक १२, समास ८.

[ ३ ]

दुर्लभ शरीरीं दुर्लभ आयुष्य, याचा करूं नये नाश,
दास ह्मणे सावकाश, विवेक पाहावा. २९
न पाहतां उत्तम विवेक, अवघा होतो अविवेक,
अविवेकें प्राणी रंक, ऐसा दिसे. ३०
हें आपलें आपण केलें, आळसें उदास नागविलें;
वाईट संगतीनें बुडविलें, देखतदेखतां. ३१

मूर्ख आळशी आणि तरणा, सर्वांविषयीं दैन्यवाणा,
कांहीं मिळेना कोणा, काय ह्मणावें ! ३२
जें जें पाहिजे तें तें नाहीं, अन्नवस्त्र तेंही नाहीं,
उत्तम गुण कांहींच नाहीं, अंतर्यामीं. ३३
बोलतां येना बैसतां येना, प्रसंग कांहींच कळेना,
शरीर मन हें वळेना, अभ्यासाकडे. ३४
लिहिणें नाहीं वाचणें नाहीं, पुसणें नाहीं सांगणें नाहीं,
नेमस्तपणाचा अभ्यास नाहीं, बाष्कळपणें. ३५
आपणास कांहींच येना, आणि शिकविलेंही मानेना,
आपण वेडा आणि सज्जना, बोल ठेवी. ३६
अंतरीं एक बाहेर एक, ऐसा जयाचा विवेक,
परलोकाचें सार्थक, कैसें घडे ? ३७
एकाग्र करूनियां मन, बळेंच धरावें साधन,
यत्नीं आळसाचें दर्शन, होऊंच नये. ३८
अवगुण अवघेच सांडावें, उत्तम गुण अभ्यासावे,
प्रबंध पाठ करीत जावे, जाड अर्थ. ३९
कोणे प्रसंगीं काय ह्मणावें, ऐसें समजोनि जाणावें,
उगेंच वाउगें शिणावें, कासयासी ? ४०
दुसऱ्याचें अंतर जाणावें, आदर देखोनि ह्मणावें,
जें आठवेल तें गावें, हें मूर्खपण. ४१
पाठ उदंडचि असावे, सर्वकाळ उजळीत जावे,
सांगीतले गोष्टीचें असावें, स्मरण अंतरीं. ४२

अखंड एकांत सेवावा, ग्रंथमात्र धांडोळावा,
प्रचीत येईल तो घ्यावा, अर्थ मनीं. ४३

दशक १८, समास २.

[ ४ ]

पाठ ह्मणतां आवरेना, पुसतां कांहींच कळेना,
अनुभव पाहातां अनुमाना-, मधें पडे. ४४
शब्दरत्नें परीक्षावीं, प्रत्ययाचीं पाहूनि घ्यावीं,
येर तीं अवघीं सांडावीं, एकीकडे. ४५
नाना शब्द एकवटले, प्रचीतीविण उपाय केले,
परी ते अवघेचि व्यर्थ गेले, फडप्रसंगीं. ४६
पसेवरी वैरण घातलें, तांतडीनें जातें ओढिलें,
तेणें पीठ बारीक आलें, हें तों घडेना. ४७
घासामागें घास घातला, अवकाश नाहीं चावायाला,
अवघा बोकणा भरला, पुढें कैसें ? ४८
ऐका फडनिशीचें लक्षण, विरंग जाऊं नेदी क्षण,
समस्तांचें अंतःकरण, संभाळीत जावें. ४९
शुद्ध सोनें पाहूनि घ्यावें, कसीं लावून तावावें,
श्रवणमननें जाणावें, प्रत्ययासी. ५०
खोटें कोठेंच चालेना, खोटें कोणास मानेना,
याकारणें अनुमाना, खरें आणावें. ५१
लिहिणें न येतां व्यापार केला, कांहींएक दिवस चालला,
पुसता सुरनीस भेटला, तेव्हां खोटें. ५२

सर्व अवघें हिशेबीं ठावें, प्रत्यक्ष साक्षीनें बोलावें,
मग सुरनिसें काय करावें, सांगाना कां ? ५३

स्वयें आपणचि गुंते, समजावीस कैसी होते,
नेणतां कोणीएक ते, आपदों लागती. ५४

जें प्रचीतीस आलें खरें, तेंचि ध्यावें अत्यादरें,
अनुभवेंवीण जीं उत्तरें, तीं फलकटें जाणावीं. ५५

शिकवूं जातां राग चढे, परंतु पुढें अद्दल घडे;
खोटा निश्चय तत्काळ उडे, लोकांमधें. ५६

खरें सांडूनि खोटें घेणें, भकाधेसि काय उणें,
त्रिभुवनीं नारायणें, न्याय केला. ५७

तो न्याय सोडितां शेवटीं, अवघें जगचि लागे पाठीं,
जनीं भांडभांडोनि हिंपुटी, किती व्हावें ? ५८

अन्यायें बहुतांस पुरवलें, हें देखिलें ना ऐकिलें,
वेडें उगेंचि भरीं भरलें, असत्याचे. ५९

असत्य ह्मणजे तेंचि पाप, सत्य जाणावें स्वरूप;
दोहोंमध्यें साक्षेप, कोणाचा करावा ? ६०

नाना भूस आणि कण, एकचि ह्मणणें अप्रमाण,
रस चोयट्यासगट कोण, शहाणा सेवी ? ६१

.......................................................

सकळ शोधूनियां एक, सार ध्यावें. ६२

दशक १८ समास ५.

[ ५ ]

लहान थोर काम कांहीं, केल्यावेगळें होत नाहीं,
करंट्या सावध पाहीं, सदैव होसी. ६३
अंतरीं नाहीं सावधानता, यत्न ठाकेना पुरता,
सुख संतोषाची वार्ता, तेथें कैंची ? ६४
ह्मणोनि आळस सोडावा, यत्न साक्षेपें जोडावा,
दुश्चितपणाचा मोडावा, थारा बळें. ६५
प्रातःकाळीं उठत जावें, 'प्रातःस्मरामि' करावें,
नित्यनेमें स्मरावें, पाठांतर. ६६
मागील उजळणी पुढें पाठ, नेम धरावा निकट,
बाष्कळपणाची वटवट, करूंचि नये. ६७
सुंदर अक्षर लिहावें, स्पष्ट नेमस्त वाचावें,
विवरविवरों जाणावें, अर्थांतर. ६८
नेमस्त नेटकें पुसावें, विशद करून सांगावें,
प्रत्ययेंवीण बोलावें, तेंचि पाप. ६९
सावधानता असावी, नीतिमर्यादा राखावी,
जनास माने ऐसी करावी, क्रियासिद्धि. ७०
बहुतांचें समाधान राखावें, बहुतांस मानेल तें बोलावें,
विलग पडों नेदावें, कथेमध्यें. ७१
लोकांस उदंड वाजी आणूं नये, लोकांचें उकलावें हृदय,
तरी मग स्वभावें होय, नामघोष. ७२
जैसें बोलणें बोलावें, तैसेंचि चालणें चालावें,
मग महंतलीला स्वभावें, अंगीं बाणे. ७३

युक्तीवीण साजिरा योग, तो दुराशेचा रोग,
संगतीच्या लोकांचा भोग, उभा ठेला. ७४
ऐसें न करावें सर्वथा, जनास पाववूं नये व्यथा,
हृदयीं चिंतावें समर्था, रघुनाथजीसी. ७५
अक्कलबंद नाहीं जेथें, अवघेंच विस्कळित तेथें,
एके अकलेविण तें, काय आहे ? ७६
घालून अकलेचा पवाड, व्हावें ब्रह्मांडाहुन जाड,
तेथें कैचें आणिलें द्वाड, करंटेपण ? ७७

दशक १३, समास ९.

---

## चातुर्यलक्षण.

रूप लावण्य अभ्यासितां नये, सहज गुणास न चले उपाय,
कांहींतरी धरावी सोय, आगंतुक गुणाची. १
काळें माणुस गोरें होईना, वनाळास यत्न चालेना,
मुक्यास वाचा फुटेना, हा सहज गुण. २
कुरूपतेचीं लक्षणें, किती ह्मणोनि सांगणें,
रूप लावण्य याकारणें, पालटेना. ३
अवगुण सोडितां जाती, उत्तम गुण अभ्यासितां येती,
कुविद्या सांडोनि शिकती, शहाणे विद्या. ४
मूर्खपण सांडितां जातें, शहाणपण शिकतां येतें,
कारभार करतां उमजतें, सकळ कांहीं. ५
ऐशी प्रचीत येते मना, तरी कां स्वहित कराना ?
सन्मार्गें चालतां जना, सज्जना मानें. ६

मान्यता आवडे जीवीं, तरी कां उपेक्षा करावी ?
चातुर्येंवीण उंच पदवी, कदापि नाहीं. ७
देह नेटकें शृंगारिलें, परी चातुर्येंविण नासलें,
गुणेंविण साजरें केलें, बाष्कळ जैसें. ८
अंतर्कळा शृंगारावी, नाना परी उमजवावी,
संपदा मेळवूनि भोगावी, सावकाश. ९
यत्न करीना शिकेना, शरीर तेंही कष्टवीना,
उत्तम गुण घेईना, सदा कोपी. १०
आपण दुसऱ्यास करावें, तें उसनें सवेंच घ्यावें,
जना कष्टवितां कष्टावें, लागेल बहु. ११
न्यायें वर्तेल तो शहाणा, अन्यायी तो दैन्यवाणा,
नाना चातुर्याच्या खुणा, चतुर जाणे. १२
जें बहुतांस मानलें, तें बहुतीं मान्य केलें,
येर तें व्यर्थचि गेलें, जगनिंद्य. १३
लोक आपणास वळावे, किंवा अवघेच कोसळावे,
आपणास समाधान फावे, ऐसें करावें. १४
समाधानें समाधान वाढे, मैत्रीनें मैत्री जोडे,
मोडितां क्षणमात्रें मोडे, बरेंपण. १५
अहो कांहो अरे कांरे, जनीं ऐकिजेतें कींरे,
कळत असतांच कांरे, निकामीपण ? १६
चातुर्यें शृंगारे अंतर, वस्त्रें शृंगारे शरीर,
दोहोंमधें कोण थोर, बरें पहा. १७

बाह्याकार शृंगारलें, तेणें लोकांच्या हातास काय आलें ?
चातुर्यें बहुतांस रक्षिलें, नानाप्रकारें. १८
बरें खावें बरें जेवावें, बरें ल्यावें बरें नेसावें,
समस्तीं बरें ह्मणावें, ऐसी वासना. १९
तनें मनें झिजावें, तेणें भले ह्मणून ध्यावें,
उगेंचि कल्पितां शिणावें, लागेल पुढें. २०
लोकीं कार्यभाग आडे, तो कार्यभाग जेथें घडे,
लोक सहजचि ओढे, कामासाठीं. २१
ह्मणोनि दुसऱ्यास सुखी करावें, तेणें आपण सुखी व्हावें,
दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें, लागेल स्वयें. २२
हें तों प्रगटचि आहे, पाहिल्याविण कामा नये,
समजणें हा उपाय, प्राणिमात्रांसी. २३
समजले आणि वर्तले, तेचि भाग्यपुरुष झाले,
यावेगळे उरले, ते करंटे पुरुष. २४
जितुका व्याप तितुकें वैभव, वैभवासारखा हावभाव,
समजलें पाहिजे उपाव, प्रगटचि आहे. २५
आळसें कार्यभाग नासतो, साक्षेपें होत होत होतो,
दिसते गोष्टी कळेना तो, शहाणा कैसा. २६
मैत्री करतां होतें कृत्य, वैर करतां होतो मृत्यु,
बोलिलें हें सत्य कीं असत्य, ओळखावें. २७
आपणास शहाणे करूं नेणे, आपलें हित आपण नेणे,
जनीं मैत्री राखों नेणे, वैर करी. २८

ऐसे प्रकारींचे जन, त्यांस ह्मणावे अज्ञान,
तयांपाशीं समाधान, कोण पावे ? २९
आपण एकाकी एकला, सृष्टींत भांडत चालला,
बहुतांमध्यें एकल्याला, यश कैचें ? ३०
बहुतांचे मुखीं उरावें, बहुतांचे अंतरीं भरावें,
उत्तमगुणीं विवरावें, प्राणिमात्रांसी. ३१

दशक १४, समास ६.

[ २ ]

दुसऱ्यांचे जीवींचें कळेना, परांतर तें जाणवेना,
वश होती लोक नाना, कोण्या प्रकारें. ३२
श्रेष्ठ कार्यें करी तो श्रेष्ठ, कृत्रिम करी तो कनिष्ठ,
कर्मानुसार प्राणी श्रेष्ठ, अथवा भले. ३३
मूर्खास वाटे मी शहाणा, परी तो वेडा दैन्यवाणा,
नाना चातुर्यांच्या खुणा, चतुर जाणे. ३४
जों जगदंतरें मिळाला, तो जगदंतरचि झाला,
अत्रीं परत्रीं तयाला, काय उणें ? ३५
अवघेच ह्मणती आह्मी थोर, अवघेचि ह्मणती आह्मी सुंदर,
अवघेच ह्मणती आह्मी चतुर, भूमंडळीं. ३६
ऐसा विचार आणितां मना, कोणीच लहान ह्मणवीना,
जाणते आणिती अनुमाना, सकळ कांहीं. ३७
लटक्याचा साभिमान घेणें, सत्य अवघेंचि सोडणें,
मूर्खपणाचीं लक्षणें, तीं हीं ऐशीं. ३८

सत्याचा जो अभिमान, तो जाणावा निरभिमान,
न्याय अन्याय समान, कदापि नव्हे. ३९
न्याय ह्मणजे तो शाश्वत, अन्याय ह्मणजे तो अशाश्वत,
बाष्कळ आणि नेमस्त एक कैसा ? ४०
आचारविचारेंविण, जें जें करणें तो तो शीण,
धूर्त आणि विचक्षण, तेचि शोधावे. ४१
उदंड बाजारी मिळाले, परी ते धूर्तेंचि आळिले,
धूर्तापाशीं कांहीं न चले, बाजाऱ्यांचें. ४२
धूर्तासि धूर्तचि आवडे, धूर्त धूर्तांच पवाडे,
उगेचि हिंडती वेडे, कार्येंविण. ४३
याकारणें मुख्य मुख्य, तयांशीं करावें सख्य,
येणेंकरितां असंख्य, बाजारी मिळती. ४४
समर्थाचें राखतां मन, तेथें येती उदंड जन,
जन आणि सज्जन, आर्जव करिती. ४५
ओळखीनें ओळख साधावी, बुद्धीनें बुद्धि बोधावी,
नीतिन्यायें वाट रोधावी, पाखंडाची. ४६
वेष धरावा बावळा, अंतरीं असाव्या नाना कळा,
सगट लोकांचा जिव्हाळा, मोडूं नये. ४७
एके ठायीं बैसोनि राहिला, तरी मग व्यापचि बुडाला,
सावधपणें ज्याला त्याला, भेटी द्यावी. ४८
भेटभेटों उरी राखणें, हीं चातुर्याचीं लक्षणें,
मनुष्यमात्र उत्तम गुणें, समाधान पावे. ४९

दशक १९, समास १.

[ ३ ]

उदंडांचें उदंड ऐकावें, परी तें प्रत्ययें पाहावें,
खरें खोटें निवडावें, अंतर्यामीं. ५०
कोणास नव्हे ह्मणों नये, समजावे अपाय उपाय,
प्रत्यय घ्यावा बहुत काय, बोलोनियां. ५१
बहुतांचे बोलीं लागले, ते प्राणी अनुमानीं बुडाले,
मुख्य निश्चय चुकले, प्रत्ययाचा. ५२
माणुस हेकाड आणि कच्चें, मान्य करावें तयाचें,
येणेप्रकारें बहुतांचें, अंतर राखावें. ५३
वेडे करावे शहाणें, तरीच जिणें श्लाघ्यवाणें,
उगेंच वादांग वाढवणें, हें मूर्खपण. ५४
जो दुसऱ्याच्या हितावरी, तो विपट कांहींच न करी,
मानत मानत विवरी, अंतर तयाचें. ५५
उगीच करिती बडबड, परी करून दाखवणें हें अवघड,
परस्थळ साधणें जड, कठीण आहे. ५६
धंके चपेटे सोसावे, नीच शब्द साहात जावे,
पस्तावोनि परावे, आपले होती. ५७
प्रसंग जाणोनि बोलावें, जाणपण कांहींच न घ्यावें;
लीनता धरून जावें, जेथें तेथें. ५८
नाना जिनसपाठांतरें, निवती सकळांचीं अंतरें,
लिहोनि देतां परोपकारें, सीमा सांडावी. ५९
जैसें जयास पाहिजे, तैसें तयास दीजे,
तरी मग श्रेष्ठचि होइजे, सकळां मान्य. ६०

भूमंडळीं सकळांस मान्य, तो ह्मणूं नये सामान्य,
कित्येक लोक अनन्य, तया पुरुषासी. ६१
ऐसीं चातुर्याचीं लक्षणें, चातुर्यें दिग्विजय करणें,
मग तयास काय उणें, जेथें तेथें. ६२

दशक १५, समास ६.

---

## उत्तमपुरुषलक्षण.

आपण यथेष्ट जेवणें, उरलें तें अन्न वांटणें,
परंतु वायां दवडणें, हा धर्म नव्हे. १
तैसें ज्ञानें तृप्त व्हावें, तेंचि ज्ञान जनास सांगावें,
तरतेनें बुडों नेदावें, बुडतयासी. २
उत्तम गुण स्वयें घ्यावे, ते बहुतांस सांगावे,
वर्तल्याविण बोलावें, ते शब्द मिथ्या. ३
शरीर परोपकारीं लावावें, बहुतांच्या कार्यास यावें,
उणें पडों नेदावें, कोणाएकाचें. ४
आडलें जाकसलें जाणावें, यथानुशक्ति कामास यावें,
मृदुवचनें बोलत जावें, कोणिएकासी. ५
दुसऱ्याच्या दुःखें दुःखी व्हावें, परसंतोषें सुखी व्हावें,
प्राणिमात्रास मेळवून घ्यावें, बऱ्या शब्दें. ६
बहुतांचे अन्याय क्षमावे, बहुतांचे कार्यभाग करावे,
आपल्यापरीस व्हावे, पारिखे जन. ७
दुसऱ्याचें अंतर जाणावें, तदनुसारचि वर्तावें,
लोकांस परीक्षित जावें, नानाप्रकारें. ८

नेमकचि बोलावें, तत्काळचि प्रतिवचन द्यावें,
कदापि रागासि न यावें, क्षमारूपें. ९
आळस अवघाच दवडावा, यत्न उदंडचि करावा,
शब्दमत्सर न करावा, कोणिएकाचा. १०
उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा, शब्द निवडून बोलावा,
सावधपणें करीत जावा, संसार आपुला. ११
मरणाचें स्मरण असावें, हरिभक्तीस सादर व्हावें,
मरोनि कीर्तीस उरवावें, येणें प्रकारें. १२
नेमकपणें वर्तों लागला, तो बहुतांस कळों आला,
सर्व आर्जवी तयाला, काय उणें ? १३
ऐसा उत्तम गुणी विशेष, तयास ह्मणावें पुरुष,
जयाच्या भजनें जगदीश, तृप्त होय. १४
उत्तम गुणीं शृंगारला, विद्यावैभवें शोभला,
तोचि एक जाणावा भला, भूमंडळीं. १५
स्वयें आपण कष्टावें, बहुतांचें सोशीत जावें,
झिजोनि कीर्तीस उरवावें, नानाप्रकारें. १६
कीर्ति पाहों जातां सुख नाहीं, सुख पाहतां कीर्ति नाहीं,
विचारेंविण कोठेंचि नाहीं, समाधान. १७
परांतरास न लावावा ढका, कदापि पडों नेदावा चुका,
क्षमाशील तयाच्या तुका, हानी नाहीं. १८
आपलें अथवा परावें, कार्य अवघेंचि करावें,
प्रसंगीं कामास चुकवावें, हें विहित नव्हे. १९

दशक १२, समास १०.

[ २ ]

आपुल्या पुरुषार्थवैभवें, बहुतांसि सुखी करावें,
परंतु कष्टी करावें, हे राक्षसीक्रिया. २०
दंभ दर्प अभिमान, क्रोध आणि कठिण वचन,
हें अज्ञानाचें लक्षण, भगवद्गीतेंत बोललें. २१
जो उत्तम गुणें शोभला, तोचि पुरुष महाभला,
कित्येक लोक तयाला, शोधीत फिरती. २२
क्रियेवीण शब्दज्ञान, तेंचि श्वानाचें वमन,
भले तेथें अवलोकन, कदापि न करिती. २३
बोलण्यासारखें चालणें, स्वयें करून बोलणें,
तयाचीं वचनें प्रमाणें, मानिती जनीं. २४
जें जें जनासी मानेना, तें तें जनही मानेना,
आपण एकला जन नाना, सृष्टीमध्यें. २५
ह्मणोनि सांगाती असावे, मानत मानत शिकवावे,
हळुहळु शेवटा न्यावे, विवेकानें. २६

दशक १२, समास १०.

[ ३ ]

नाना वस्त्रें नाना भूषणें, येणें शरीर शृंगारणें,
विवेकें विचारें राजकारणें, अंतर शृंगारिजे. २७
शरीर सुंदर सतेज, वस्त्रें भूषणें केलें सज्ज,
अंतरीं नसतां चातुर्यबीज, कदापि शोभा न पावे! २८
तुंद हेंकाड कठोरवचनी, अखंड तोले साभिमानी,
न्याय नीति अंतःकरणीं, घेणार नाहीं. २९

तऱ्हे शीघ्रकोपी सदा, कदापि न धरी मर्यादा,
राजकारण संवादा, मिळोंच नेणें. ३०
ऐसे लौंद बेइमानी, कदापि सत्य नाहीं वचनीं,
पापी अपस्मार जनीं, राक्षस जाणावे! ३१
अति सर्वत्र वर्जावें, प्रसंग पाहोनि चालावें,
हटनिग्रहीं न पडावें, विवेकी पुरुषें. ३२
बहुतच करितां हट, तेथें येऊन पडिले तट,
कोणीएकाचा शेवट, झाला पाहिजे. ३३
महायत्नें सावधपणें, समयीं धारिष्ट धरणें,
अद्भुतचि कार्य करणें, देणें ईश्वराचें. ३४

दशक १८, समास ६.

# भाग ३ रा.

## धर्मप्रकरण.

### परमार्थस्तवन.

आतां स्तवूं हा परमार्थ, जो साधकांचा निजस्वार्थ,
ना तरी समर्थांमध्यें समर्थ, योग हा. १
आहे तरी परम सुगम, परी जनांस जाहला दुर्गम,
कां जयाचें चुकलें वर्म, सत्समागमाकडे. २
अपूर्वता या परमार्थाची, वार्ता नाहीं जन्ममृत्यूची,
आणि पदवी सायुज्यतेची, सन्निधचि लाभे. ३
परमार्थ सकळांस विसांवा, सिद्ध साधु महानुभावां,
शेखीं सात्त्विक जडजीवां, सत्संगेंकरूनी. ४
परमार्थ जन्माचें सार्थक, परमार्थ संसारीं तारक,
परमार्थ दाखवी परलोक. धार्मिकासी. ५
परमार्थ तापसांसी थार, परमार्थ साधकांसी आधार,
परमार्थ दाखवी पार, भवसागराचा. ६
परमार्थी तो राज्यधारी, परमार्थ नाहीं तो भिकारी,
या परमार्थाची सरी, कोणास द्यावी ? ७
जेणें परमार्थ वोळखिला, तेणें जन्म सार्थक केला,
येर तो पापी जन्मला, कुळक्षयाकारणें. ८
असो भगवत्प्राप्तीविण, करी संसाराचा शीण,
त्या मूर्खाचें मुखावलोकन, करूंच नये ! ९

भल्यानें परमार्थीं भरावें, शरीर सार्थक करावें,
पूर्वजांसी उद्धरावें, हरिभक्ति करूनी. १०

दशक १, समास ९.

---

## प्रपंच आणि परमार्थ.

आधीं प्रपंच करावा नेटका, मग घ्यावें परमार्थविवेका,
येथें आळस करूं नका, विवेक हो ! १
प्रपंच सांडूनि परमार्थ कराल, तेणें तुह्मी कष्टी व्हाल,
प्रपंचपरमार्थ चालवाल, तरी तुह्मी विवेकी. २
प्रपंच सांडूनि परमार्थ केला, तरी अन्न मिळेना खायाला,
मग तया करंट्याला, परमार्थ कैंचा ? ३
परमार्थ सांडून प्रपंच करिसी, तरी तूं यमयातना भोगिसी,
अंतीं परम कष्टी होसी, यमयातना भोगितां. ४
संसारीं असतां मुक्त, तोचि जाणावा संयुक्त,
अखंड पाहे युक्तायुक्त विचारणा हे. ५
प्रपंचीं जो सावधान, तो परमार्थ करील जाण,
प्रपंचीं जो अप्रमाण, तो परमार्थी खोटा. ६
ह्मणोनि सावधानपणें, प्रपंच परमार्थ चालवणें,
ऐसें न करतां भोगणें, नाना दुःखें. ७
ह्मणोनि असावी दीर्घसूचना, अखंड करावी चालना,
पुढील होणार अनुमाना, आणून सोडावें. ८
सुखी असतो खबरदार, दुःखी होतो बेखबर,
ऐसा हा लौकिक विचार, दिसतचि आहे. ९

ह्मणोनि सर्व सावधान, धन्य तयाचें महिमान,
जनीं राखे समाधान, तोचि एक. १०
चाळणेचा आळस केला, तरी अवचितां पडेल घाला,
ते वेळीं सांवरायाला, अवकाश कैंचा ? ११
ह्मणूनि दीर्घसूचनेचे लोक, त्यांचा पाहावा विवेक,
लोकांकरितां लोक, शहाणे होती. १२
परी ते शहाणे ओळखावे, गुणवंताचे गुण घ्यावे,
अवगुण देखोनि सांडावे, जनांमध्यें. १३
मनुष्य पारखूं राहेना, आणि कोणाचें मन तोडीना,
मनुष्यमात्र अनुमाना, आणून पाहे, १४
दिसे सकळांस सारिखा, पाहातां विवेकी नेटका,
कामी निकामी लोकां, बरें पाहे. १५
जाणोनि पाहिजेत सर्व, हेंचि तयांचें अपूर्व,
ज्याचें त्यापरी गौरव, राखों जाणे. १६

दशक ११, समास २.

---

## नरदेहप्रशंसा.

धन्य धन्य हा नरदेहो, येथील अपूर्वता पहाहो,
जो जो कीजे परमार्थलाहो, तो तो पावे सिद्धीतें.
या नरदेहाचेनि आधारें, नाना साधनांचेनि द्वारें,
मुख्य सारासार विचारें, बहुत सुटले. २
पशुदेहीं नाहीं गति, ऐसें सर्वत्र बोलती,
ह्मणोनि नरदेहींच प्राप्ती, परलोकाची. ३

ह्मणोनि नरदेह श्रेष्ठ, नाना देहांमधें वरिष्ठ,
जयाचेनि चुके अरिष्ट, यमयातनेचें. ४
संत महंत ऋषि मुनि, सिद्ध साधु समाधानी,
भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी, विरक्त योगी तपस्वी. ५
तत्वज्ञानी योगाभ्यासी, ब्रह्मचारी दिगंबर संन्यासी,
षड्दर्शनी तापसी, नरदेहींच जाहले. ६
नरदेह हा स्वाधीन, सहसा न्हे पराधीन,
परंतु हा परोपकारीं झिजवून, कीर्तिरूपें उरवावा. ७
अश्व वृषभ गाई ह्मैशी, नाना पशु स्त्रिया दासी,
कृपाळूपणें सोडितां त्यांसी, कोण तरी धरील. ८
तैसा न्हे हा नरदेहो, इच्छा जावो अथवा राहो,
परी यास कोणी पहा हो, बंधन करूं शकेना. ९
नरदेह पांगुळा असता, तरी तो कार्यास न येता,
अथवा थोटा जरी असता, तरी परोपकारास नये. १०
नरदेह अंध असला, तरी तो निपटचि वायां गेला,
अथवा बधिर जरी असला, तरी निरूपण नाहीं. ११
नरदेह असला मुका, तरी घेतां नये आशंका,
अशक्त रोगी नासका, तरी तो निष्कारण. १२
नरदेह असला मूर्ख, अथवा फेंपऱ्या समंधाचें दुःख,
तरी तो जाणावा निरर्थक, निश्चयेंसी. १३
सांग नरदेह जोडलें, आणि परमार्थबुद्धि विसरलें,
तें मूर्ख कैसें भ्रमलें, मायाजाळीं. १४

देह परमार्थी लाविलें, तरीच याचें सार्थक झालें,
नाहीं तरी व्यर्थचि गेलें, नाना आघातें मृत्युपंथें. १९
दशक २, समास १०.

---

## नरदेहमहती.

बीज थोडें पेरिजेतें, पुढें त्याचें उदंड होतें,
तैसें झालें आत्मयातें, खाणी वाणी प्रगटतां. १
ऐसी सत्ता प्रबळली, थोडे सत्तेची उदंड झाली,
मनुष्यवेषें सृष्टि भोगिली, नाना प्रकारें. २
प्राणी मारूनि श्वापद पळे, वरकड त्यास काय कळे,
नाना भोग तो निवळे, मनुष्यदेहीं. ३
नाना शब्द नाना स्पर्श, नाना रूप नाना रस,
नाना गंध ते विशेष, नरदेह जाणे. ४
अमूल्य रत्नें नाना वस्त्रें, नाना यानें नाना शस्त्रें,
नाना विद्या कळा शास्त्रें, नरदेह जाणे. ५
पृथ्वी सत्तेनें व्यापिली, स्थळोस्थळीं आटोपिली,
नाना विद्या कळा केली, नाना धारणा. ६
दृश्य अवघेंचि पाहावें, स्थानमान संभाळावें,
सारासार विचारावें, नरदेह जाहलिया. ७
इहलोक आणि परलोक, नाना प्रकारचा विवेक,
विवेक आणि अविवेक, मनुष्य जाणे. ८
नाना पिंडीं ब्रह्मांडरचना, नाना मुळींची कल्पना,
नाना प्रकारीं धारणा, मनुष्य जाणे. ९

अष्टभोग नवरस, नाना प्रकारींचा विलास,
वाच्यांश लक्ष्यांश सारांश, मनुष्य जाणे. १०
मनुष्यें सकळांस आळिलें, त्या मनुष्यास देवें पाळिलें,
ऐसें हें अवघें कळलें, नरदेहयोगें. ११
नरदेह परम दुर्लभ, येणें घडे अलभ्य लाभ,
दुर्लभ तें सुलभ, होत आहे. १२
वरकड देह हें काबाड, नरदेह मोठें घबाड,
परंतु पाहिजे जाड, विवेकरचना, १३
येथें जेणें आळस केला, तो सर्वस्वें बुडाला,
देव नाहीं ओळखला, विवेकबळें, १४
नर तोचि नारायण, जरी प्रत्ययें करी श्रवण,
मननशील अंतःकरण, सर्वकाळ. १५
जेणें स्वयेंचि पोहावें, त्यास कासेस नलगे लागावें,
स्वतंत्रपणें शोधावें, सकळ कांहीं. १६
सकळ शोधून राहिला, संदेह कैंचा तयाला ?
पुढें विचार कैसा जाहला, त्याचा तोचि जाणे. १७

दशक २०, समास ९.

---

## गुणत्रय.

मुळीं देह त्रिगुणांचा, सत्त्वरजतमांचा,
त्यामध्यें सत्वाचा, उत्तम गुण. १
सत्वगुणें भगवद्भक्ति, रजोगुणें पुनरावृत्ती,
तमोगुणें अधोगती, पावती प्राणी. २

त्यांतही शुद्ध आणि शबल, तेही बोलिजेती सकळ,
शुद्ध तेंचि जें निर्मळ, शबल बाधक जाणावें. ३
शुद्ध शबलाचें लक्षण, सावध परिसा विचक्षण,
शुद्ध तो परमार्थी जाण, शबल तो संसारिक. ४
रज तम आणि सत्व, तेणेंचि चाले जीवित्व,

दशक २ समास ५.

---

## रजोगुण.

रजोगुण येतां शरीरीं, वर्तणूक कैसी करी,
सावध होऊनि चतुरीं, परिसावें. १
माझें घर माझा संसार, देव कैंचा आणिला थोर,
ऐसा करी जो निर्धार, तो रजोगुण. २
बरें खावें बरें जेवावें, बरें ल्यावें बरें नेसावें,
दुसऱ्याचें अभिलाषावें, तो रजोगुण. ३
मी तरुण मी सुंदर, मी बलाढ्य मी चतुर,
मी सकळांमध्यें थोर, ह्मणे तो रजोगुण. ४
दुसऱ्याचें सर्व जावें, माझेंच बरें असावें,
ऐसें आठवी स्वभावें, तो रजोगुण. ५
वैभव देखोनि कष्टी, आवडी उपजली पोटीं,
आशागुणें हिंपुटी, करी तो रजोगुण. ६
जें जें दृष्टीं पडलें, तें तें मनें मागितलें,
लभ्य नसतां दुःख झालें, तो रजोगुण. ७

टवाळी ढवाळी निंदा, सांगणें घडे विवादा,
हास्यविनोद करी सर्वदा, तो रजोगुण. ८
आळस उठे प्रबळ, कर्मणुकीचे नाना खेळ,
कां उपभोगाचे गोंधळ, तो रजोगुण. ९
तस्करविद्या जीवीं उठे, परन्यून बोलावें वाटे,
नित्यनेमासी मन विटे, तो रजोगुण. १०
देवकारणीं लाजाळू, उदरालागीं कष्टाळू,
प्रपंचीं जो स्नेहाळू, तो रजोगुण. ११
गोडग्रासीं आळकेपण, अत्यादरें पिंडपोषण.
रजोगुणें उपोषण, केलें न वचे. १२
नेणोनियां परमात्मा, सकळ पदार्थीं प्रेमा,
बलात्कारें घाली जन्मा, तो रजोगुण. १३
असो ऐसा रजोगुण, लोभें दावी जन्ममरण,
प्रपंचीं तो शबळ जाण, दारुण दुःख भोगवी. १४
आतां रजोगुण हा सुटेना, संसारिक हे तुटेना,
प्रपंचीं गुंतली वासना, यासि उपाय कवण ? १५
उपाय एक भगवद्भक्ति, जरी ठाकेना विरक्ति,
तरी यथानुशक्ति, भजन करावें. १६
काया वाचा आणि मनें, पत्रें पुष्पें फळें जीवनें,
ईश्वरीं अर्पोनियां मनें, सार्थक करावें. १७
यथानुशक्ति दानपुण्य, परी भगवंतीं अनन्य,
सुखदुःखें परी चिंतन, देवाचेंचि करावें. १८

आदिअंतीं एक देव, मध्येंच लाविली माव,
ह्मणोनियां पूर्ण भाव, भगवंतीं असावा. १९
ऐसा शबल रजोगुण, संक्षेपें केलें कथन,
आतां पुढें तमोगुण, श्रोतीं परिसावा. २०

दशक २, समास ५.

---

## तमोगुण.

मागां बोलिला रजोगुण, क्रियेसहित लक्षण,
आतां ऐका तमोगुण, तोही सांगिजेल. १
संसारीं दुःखसंबंध, प्राप्त होतां उठे खेद,
कां अद्भुत आला क्रोध, तो तमोगुण. २
शरीरीं क्रोध भरतां, नोळखे मातापिता,
बंधु बहीण कांता, ताडी तो तमोगुण. ३
भरलें क्रोधाचें काविरें, पिशाचापरी वावरे,
नाना उपायीं नावरे, तो तमोगुण. ४
अखंड भ्रांति पडे, केला निश्चय बिघडे,
अत्यंत निद्रा आवडे, तो तमोगुण. ५
क्षुधा जयाची वाड, नेणे कडू अथवा गोड,
अत्यंत जो कां मूढ, तो तमोगुण. ६
किडा मुंगी आणि श्वापद, यांचा करूं आवडे वध,
अत्यंत जो कृपामंद, तो तमोगुण. ७
अंतरीं धरून कपट, पराचें करी तळपट,
सदा मस्त सदा उद्धट, तो तमोगुण. ८

कलह व्हावा ऐसें वाटे, झोंबी घ्यावी ऐसें उठे,
अंतरीं द्वेष प्रकटे, तो तमोगुण. ९
सत्कर्मे तीं नावडती, नाना दोष ते आवडती,
पापभय नाहीं चित्तीं, तो तमोगुण. १०
भांडण लावूनि द्यावें, स्वयें कौतुक पाहावें,
कुबुद्धि घेतली जीवें, तो तमोगुण. ११
प्राप्त जालिया संपत्ति, जीवांसी करी यातायाती,
कळवळा नये चित्तीं, तो तमोगुण. १२
परपीडेचा संतोष, निष्ठुरपणाचा हव्यास,
संसाराचा न ये त्रास, तो तमोगुण. १३
स्नानसंध्या नेम नसे, स्वधर्मीं भ्रष्टला दिसे,
अकर्तव्य करीतसे, तो तमोगुण. १४
ज्येष्ठ बंधु बाप माय, त्यांचीं वचनें न साहे,
शीघ्रकोपी निघून जाय, तो तमोगुण. १५
उगेंच खावें उगेंच असावें, स्तब्ध होऊन बैसावें,
कांहींच स्मरेना स्वभावें, तो तमोगुण. १६
देवाची जो निंदा करी, तो आशाबद्ध अघोरी,
जो संतसंग न धरी, तो तमोगुण. १७
ऐसा हा तमोगुण, सांगतां तो असाधारण,
परी त्यागार्थ निरूपण, कांहींएक. १८
ऐसें वर्ते तो तमोगुण, परी हा पतनासी कारण,
मोक्षप्राप्तीचें लक्षण, नव्हे येणें. १९

दशक २, समास ६.

## सत्त्वगुण.

मागां बोलिला तमोगुण, जो दुःखदायक दारुण,
आतां ऐका सत्त्वगुण, परम दुर्लभ. १
जेणें होय उत्तम गति, मार्ग फुटे भगवंतीं,
जेणें पाविजे मुक्ती, सायुज्यता ती. २
जो परम सुखकारी, जो आनंदाची लहरी,
देऊनियां निवारी, जन्ममृत्यु. ३
ऐसा हा सत्त्वगुण, देहीं उमटतां आपण,
तये क्रियेचें लक्षण, ऐसे असे. ४
ईश्वरीं प्रेमा अधिक, प्रपंच संपादणें लौकिक,
सदा सन्निध विवेक, तो सत्त्वगुण. ५
संसारदुःख विसरवी, भक्तिमार्ग विमळ दावी,
भजनक्रिया उपजवी, तो सत्त्वगुण. ६
परमार्थाची आवडी, उठे भावार्थाची गोडी,
परोपकारीं तांतडी, तो सत्त्वगुण. ७
स्नानसंध्या पुण्यशीळ, अभ्यंतरींचा निर्मळ,
शरीर वस्त्रें सोज्ज्वळ, तो सत्त्वगुण, ८
निरूपणाची आवडी, जया हरिकथेची गोडी,
क्रिया पालटे रोकडी, तो सत्त्वगुण. ९
शब्द कठीण न बोले, अतिनेमेंसि चाले,
योगी जेणें तोषविले, तो सत्त्वगुण. १०
शरीर लावावें कारणीं, साक्षेप उठे अंतःकरणीं,
सत्त्वगुणाची कारणीं, ऐशी असे. ११

शांति क्षमा दया, निश्चय उपजे जया,
सत्त्वगुण जाणावा तया, अंतरीं आला. १२
जेणें जिंकिली रसना, तृप्त जयाची वासना,
जयासी नाहीं कामना, तो सत्त्वगुणी. १३
देह आपदेनें पीडला, क्षुधेतृषेनें वोसावला,
तरी निश्चय राहिला, तो सत्त्वगुण. १४
सकळांस नम्र बोले, मर्यादा धरूनि चाले,
सर्वजन तोषविले, तो सत्त्वगुण. १५
जयासी अहंकार नसे, नैराश्यता विलसे,
जयापाशीं कृपा वसे, तो सत्त्वगुण. १६
सकळ जनांसि आर्जव, नाहीं विरोधासि ठाव,
परोपकारीं वेंची जीव, तो सत्त्वगुण. १७
आपकार्याहूनि जीवीं, परकार्यसिद्धि करावी,
मरूनि कीर्ति उरवावी, तो सत्त्वगुण. १८
पराव्याचे दोषगुण, दृष्टीस देखे आपण,
समुद्रा ऐसी साठवण, तो सत्त्वगुण. १९
नीच उत्तर साहणें, प्रत्युत्तर न देणें,
आपला क्रोध सांवरणें, तो सत्त्वगुण. २०
शरीरें त्रास साहणें, दुर्जनासि मिळोनि जाणें,
निंदकास उपकार करणें, हा सत्त्वगुण. २१
मन भलतीकडे धांवे, तें विवेकें आवरावें,
इंद्रियदमन करावें, तो सत्त्वगुण. २२

सत्क्रिया आचरावी, असत्क्रिया त्यागावी,
वाट भक्तीची धरावी, तो सत्त्वगुण. २३
जया आवडे प्रातःस्नान, आवडे पुराण श्रवण,
नाना मंत्रीं देवतार्चन, करी तो सत्त्वगुण. २४
कोणी एकास मारी, तयासी जाऊनि वारी,
जीव बंधनमुक्त करी, तो सत्त्वगुण. २५
सन्मार्ग दाखवी जना, जो लावी हरिभजना,
ज्ञान शिकवी अज्ञाना, तो सत्त्वगुण. २६
परपीडेचें वाहे दुःख, परसंतोषाचें सुख,
वैराग्य देखोनि हरिख, तो सत्त्वगुण. २७
परभूषणें भूषण, परदूषणें दूषण,
परदुःखें शिणे जाण, तो सत्वगुण. २८
आतां असो हें बहुत, देवीं धर्मीं ज्याचें चित्त,
भजे कामनारहित, तो सत्त्वगुण. २९
ऐसा हा सत्त्वगुण सात्त्विक, संसारसागरीं तारक,
येणें उपजे विवेक, ज्ञानमार्गाचा. ३०
सत्त्वगुणें भगवद्भक्ति, सत्त्वगुणें ज्ञानप्राप्ती,
सत्त्वगुणें सायुज्यमुक्ति, पाविजे ते. ३१

दशक २, समास ७.

---

## तापत्रय.

[ संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण यांच्या योगानें व त्यांत पापपुण्याचें प्रमाण असेल त्या मानानें आपल्या देहाला व जीवाला ताप (त्रास) भोगावे लागतात, त्यांचें स्पष्टीकरण खालीं केलें आहे. ]

तापत्रयाचें लक्षण, आतां सांगिजेल निरूपण,
श्रोतीं करावें श्रवण, एकाग्र होउनी. १
एक ताप आध्यात्मिक, दुजा तो आधिभौतिक,
तिसरा आधिदैविक, ताप जाणावा. २
देह इंद्रियें आणि प्राण, यांचेनि योगें आपण,
सुखदुःखें शिणे जाण, या नांव आध्यात्मिक. ३
देहामधून जें आलें, इंद्रियप्राणें दुःख झालें,
तें आध्यात्मिक बोललें, तापत्रय. ४
नाना चिंतेची काळजी, नाना दुःखें चित्त पोळी,
व्याधींवांचून तळमळी, या नांव आध्यात्मिक. ५
वृद्धपणींच्या आपदा, नाना रोग होती सदा,
देह क्षीण सर्वदा, या नांव आध्यात्मिक. ६
नाना व्याधि नाना दुःखें, नाना भोग नाना खांडकें,
प्राणी तळमळी शोकें, या नांव आध्यात्मिक. ७
ऐसा आध्यात्मिक ताप, पूर्वपापाचा संताप,
सांगतां सरेना अमूप, दुःखसागर. ८

दशक ३, समास ६.

[२]

सर्व भूतांचेनि संयोगें, सुखदुःख उपजों लागे,
ताप होतां मन भंगे, या नांव आधिभौतिक. ९
ठेंचा लागती मोडती कांटे, विझती शस्त्रांचे घायटे,
सल शिलका आणि सराटे, या नांव आधिभौतिक. १०
पराधीन बाळपणीं, कुशब्दमारजाचणी,
अन्नवस्त्रेंवीण आळणी, या नांव आधिभौतिक. ११
बहु रोग बहु औषधें, सांगतां अपार अगाधें.
प्राणी दुखवे तेणें खेदें, या नांव आधिभौतिक. १२
बाहेरी निघतां अपशकुन, नाना प्रकारीं विच्छिन्न,
तेणें गुणें भंगे मन, या नांव आधिभौतिक. १३
मनुष्यहानि वित्तहानि, वैभवहानि महत्त्वहानि,
पशुहानि पदार्थहानि, या नांव आधिभौतिक. १४
दुःख दारिद्र्य आणि ऋण, विदेशपळणी नागवण,
आपदा अनुपत्ति कदान्न, या नांव आधिभौतिक. १५
ऐसे सांगतां अपार, आहेत दुःखाचे डोंगर,
श्रोतीं जाणावा विचार, आधिभौतिकाचा. १६

दशक ३, समास ७.

[३]

शुभाशुभ कर्मानें जना, देहांतीं यमयातना,
स्वर्ग नरक भोग नाना, या नांव आधिदैविक. १७
नाना दोष नाना पातकें, मदांधपणें अविवेकें,
केलीं परी तीं दुःखदायकें, यमयातना भोगविती. १८

नीति सांडोनियां तत्त्वतां, करूं नये तेंचि करतां,
यमयातना भोगितां, जीव जाय. १९
मातलेपणें उन्मत्त, जीवघात कुटुंबघात,
अप्रमाण क्रिया करीत, ह्मणोनि यमयातना. २०
यमदंड यमयातना, शास्त्रीं बोलिले प्रकार नाना,
तो भोग कदापि चुकेना, या नांव आधिदैविक. २१
यमयातनेचें खेद, शास्त्रीं बोलिले विशद,
शरीरीं घालून अप्रमाद, नानाप्रकारें. २२
पापपुण्याचीं शरीरें, स्वर्गीं असती कलेवरें,
त्यांत घालोनि नाना प्रकारें, पापपुण्यें भोगविती. २३
नाना पुण्यें नाना विलास, नाना दोषें यातना कर्कश,
शास्त्रीं बोलिले अविश्वास, मानूंच नये. २४
वेदाज्ञेनें न चालती, हरिभक्ति न करिती,
त्यांस यम यातना करिती, या नांव आधिदैविक. २५
तप्त भूमिका ताविती, जळत स्तंभ पोटा लाविती,
नाना सांडस लाविती, या नांव आधिदैविक. २६
यमदंडाचे उदंड मार, यातनेची सामुग्री अपार,
भोग भोगिती पापी नर, या नांव आधिदैविक. २७
कर्कश वचनें कर्कश मार, यातनेचे नाना प्रकार,
त्रास पावती दोषी नर, या नांव आधिदैविक. २८
आध्यात्मिक आणि आधिभौतिक, त्याहूनि विशेष आधिदैविक,
अल्पसंकेतें कांहीं एक, कळावया बोलिलों. २९

दशक ३, समास ८.

## सद्गुरुलक्षण.

[ तापत्रयाचा नाश होण्याला सद्गुरुकृपा पाहिजे, ]

जे यातीचा जो व्यापार, शिकविती भरावया उदर,
तेही गुरु परी साचार, सद्गुरु नव्हेत. १
आपली माता आणि पिता, तेही गुराचि तत्वता,
गायत्रीमंत्र उपदेशिता, तो होय कुलगुरु. २
जो कोणी ज्ञान बोधी, समूळ अविद्या छेदी,
इंद्रियदमन प्रतिपादी, तो सद्गुरु जाणावा. ३
मुख्य सद्गुरूचें लक्षण, आधीं पाहिजे विमळ ज्ञान,
निश्चयाचें समाधान, स्वरूपस्थिति. ४
याहीवरी वैराग्य प्रबळ, वृत्ति उदास केवळ,
विशेष आचारें निर्मळ, स्वधर्मविषयीं. ५
याहीवरी अध्यत्मश्रवण, हरिकथा निरूपण,
जेथें परमार्थविवरण, निरंतर. ६
जेथें सारासारविचार, तेथें होय जगदुद्धार,
नवविधा भक्तीचा आधार, बहुत जनासी. ७
ह्मणोनि नवविधाभजन, जेथें प्रतिष्ठिलें साधन,
हें सद्गुरुचें लक्षण, श्रोतीं ओळखावें. ८
ह्मणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन, स्वधर्मकर्म साधन,
कथा निरूपण श्रवण मनन, नीति न्याय मर्यादा. ९
यामध्य एक उणें असे, तेणें तें विलक्षण दिसे,
ह्मणोनि सर्वही विलसे, सद्गुरूपाशीं. १०

आतां असो हा विचारु, स्वयातीचा पाहिजे गुरु,
नाहीं तरी भ्रष्टाकारू, नेमस्त घडे. ११
जे जे यातीचा जो व्यापारू, ते ते त्याचे तितुके गुरु,
याचा पाहातां विचारु, उदंड आहे. १२
नाना सद्विद्येचे गुण, याहीवरी कृपाळूपण,
सद्गुरूचें हें लक्षण, जाणिजे श्रोतीं. १३

दशक ५, समास २.

---

## गुरु आणि शिष्य.

सद्गुरूविण सच्छिष्य, तो वायां जाय निःशेष,
कां सच्छिष्येंविण विशेष, सद्गुरु शिणे. १
उत्तम भूमि शोधिली शुद्ध, तेथें बीज पेरलें किडखाद,
कां तें उत्तम बीज परी संबंध, खडकेसि पडला ! २
अथवा गुरु पूर्ण कृपा करी, परी शिष्य अनधिकारी,
भाग्यपुरुषाचा भिकारी, पुत्र जैसा. ३
ह्मणोनि सद्गुरु आणि सच्छिष्य, तेथें न लगती सायास,
त्या उभयतांचा हव्यास, पुरे एकसरा. ४
सुभूमि आणि उत्तम कण, उगवेना पर्जन्येंविण,
तैसें अध्यात्मनिरूपण, नसतां होय. ५
शेत पेरिलें आणि उगवलें, परंतु निगेविण गेलें,
साधनेंविण तैसें झालें, साधकांसी. ६
जोंवरी पीक आपणासी भोगे, तोंवरी अवघेंची करणें लागे,
पीक आलियाहि उगें, राहूंच नये. ७

तैसें आत्मज्ञान झालें, परी साधन पाहिजे केलें,
एक वेळ उदंड जेविलें, तरी सामुग्री पाहिजे. ८
ह्मणोनि साधन अभ्यास आणि सद्गुरु सच्छिष्य आणि सच्छा
विचारु। सत्कर्म सद्वासना पारु। पाववी भवाचा. ९
सदुपासना आणि सत्कर्म, सत्क्रिया आणि स्वधर्म,
सत्संग आणि नित्यनेम, निरंतर. १०
ऐसें हें अवघेंचि मिळे, तरीच विमल ज्ञान निवळे,
नाहीं तरी पाषांड संचरे, बळें समुदायीं. ११
येथें शब्द नाहीं शिष्यासी, हें अवघें सद्गुरुपाशीं,
सद्गुरु पालटी अवगुणासी, नाना यत्नेंकरूनी. १२
याकारणें सद्गुरु पाहिजे, तरीच सन्मार्ग लाहिजे,
नाहीं तरी होइजे, पाषांडा वरपडे. १३

दशक ५, समास ३.

---

## सच्छिष्यलक्षण.

मुख्य सच्छिष्याचें लक्षण, सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण,
अनन्यभावें शरण, या नांव सच्छिष्य. १
शिष्य पाहिजे निष्ठावंत, शिष्य पाहिजे शुचिष्मंत,
शिष्य पाहिजे नेमस्त, सर्वप्रकारीं. २
शिष्य पाहिजे अति धीर, शिष्य पाहिजे अति उदार,
शिष्य पाहिजे अति तत्पर, परमार्थाविषयीं. ३
शिष्य पाहिजे परोपकारी, शिष्य पाहिजे निर्मत्सरी,
शिष्य पाहिजे अर्थांतरीं, प्रवेशकर्ता. ४

शिष्य पाहिजे परम शुद्ध, शिष्य पाहिजे परम सावध,
शिष्य पाहिजे अगाध, उत्तम गुणाचा. ५
शिष्य पाहिजे प्रज्ञावंत, शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त,
शिष्य पाहिजे नीतिवंत, मर्यादेचा. ६
शिष्य पाहिजे युक्तिवंत, शिष्य पाहिजे बुद्धिवंत,
शिष्य पाहिजे संतासंत, विचार घेता. ७
शिष्य पाहिजे धारिष्टाचा, शिष्य पाहिजे दृढ व्रताचा,
शिष्य पाहिजे उत्तम कुळीचा, पुण्यशीळ. ८
शिष्य असावा सात्विक, शिष्य असावा भजक,
शिष्य असावा साधक, साधन कर्ता. ९
शिष्य असावा विश्वासी, शिष्य असावा कायाक्लेशी,
शिष्य असावा परमार्थासी, वाढवूं जाणे. १०
शिष्य असावा सद्विद्येचा, शिष्य असावा सद्भावाचा,
शिष्य असावा अंतरींचा, परम शुद्ध. ११
शिष्य असावा स्वतंत्र, शिष्य असावा जगन्मित्र,
शिष्य असावा सत्पात्र, सर्व गुणें. १२
गुरुदेवास बरोबरी, करी तो शिष्य दुराचारी,
भ्रांति बैसली अभ्यंतरीं, सिद्धांत नेणवे. १३

दशक ५, समास ३.

---

## असच्छिष्यलक्षण.

घडी एक रडे आणि पडे, घडी एक वैराग्य चढे,
घडी एक अहंभाव जडे, ज्ञातेपणाचा. १

घडी एक विश्वास धरी, सवेंचि घडी एक गुरगुरी,
ऐसे नाना छंद करी, पिसाट जैसा. २
काम क्रोध मद मत्सर, लोभ मोह नाना विकार,
अभिमान कापट्य तिरस्कार, हृदयीं नांदती. ३
दीर्घसूत्री कृतघ्न पापी, कुकर्मी कुतर्की विकल्पी,
अभक्त अभाव शीघ्रकोपी, निष्ठुर परघातक. ४
हृदयशून्य आणि आळसी, अविवेकी आणि अविश्वासी,
अधीर अविचार संदेहासी, दृढ धर्ता. ५
आशा ममता तृष्णा कल्पना, कुबुद्धि दुर्वृत्ति दुर्वासना,
अल्पबुद्धि क्रीडाकामना, हृदयीं वसे. ६
ईषणा असूया तिरस्कारें, निंदेस प्रवर्ते आदरें,
देहाभिमानें हुंबरे, जाणपणें. ७
क्षुधा तृषा आवरेना, निद्रा सहसा धरेना,
कुटुंबचिंता ओसरेना, भ्रांति पडली. ८
शाब्दिक बोले उदंड वाचा, लेश नाहीं वैराग्याचा,
अनुताप धारिष्ट साधनांचा, मार्ग न धरी. ९
आर्जव नाहीं जनांसी, जो अप्रिय सज्जनांसी,
जयाचे जीवीं अहर्निशीं, परन्यून वसे. १०
सदासर्वकाळ लटिका, बोले मायिक लापणिका,
क्रिया विचार पाहतां एका, वचनीं सत्य नाहीं. ११
परपीडेविषयीं तत्पर, जैसा विंचू आणि विखार,
तैसा कुशब्दें जिव्हार, भेदी सकळांचें. १२

आपले झांकी अवगुण, पुढिलांस बोले कठीण,
मिथ्या गुणदोषेंविण, गुणदोष लावी. १३
स्वयें पापात्मा अंतरीं, पुढिलांची कणव न करी,
जैसा हिंसक दुराचारी, परदुःखें शिणेना. १४
दुःख पराव्याचें नेणती, दुर्जन गांजलेच गांजती,
श्रम पावतां आनंदती, आपुले मनीं. १५
स्वदुःखें झुरे अंतरीं, आणि परदुःखें हास्य करी,
तयासी प्राप्ती यमपुरी, राजदूत ताडिती. १६
असो ऐसे गुणावेगळे, ते सच्छिष्य आगळे,
दृढ भावार्थें सोहळे, भोगिती स्वानंदाचे. १७

दशक ५, समास ३.

---

## नरदेहकर्तव्य.

नाना सुकृतांचें फळ, तो हा नरदेह केवळ,
त्याहीमध्यें भाग्य सफळ, तरीच सन्मार्ग लागे. १
भगवद्भक्ति हे उत्तम, त्याहीवरी सत्समागम,
काळ सार्थक हाच परम, लाभ जाणावा. २
नरदेहीं आलिया एक, कांहीं करावें सार्थक,
जेणें पाविजे परलोक, परम दुर्लभ जो. ३
विधियुक्त ब्रह्मकर्म, अथवा दया दान धर्म,
अथवा करणें सुगम, भजन भगवंताचें. ४
अनुतापें करावा त्याग, अथवा करणें भक्तियोग,
नाहीं तरी धरणें संग, साधुजनांचा. ५

नाना शास्त्रें धांडोळावीं, अथवा तीर्थे तरी करावीं,
अथवा पुरश्चरणें बरवीं, पापक्षयाकारणें. ६
अथवा कीजे परोपकार, अथवा ज्ञानाचा विचार,
निरूपणीं सारासार, विवेक करणें. ७
पाळावी वेदांची आज्ञा, कर्मकांड उपासना,
जेणें होइजे ज्ञाना, अधिकारपात्र. ८
काया वाचा आणि मनें, पत्रें पुष्पें फळें जीवनें,
कांहीं तरी एका भजनें, सार्थक करावें. ९
जन्मा आलियाचें फळ, कांहीं करावें सफळ,
ऐसें न करितां निष्फळ, भूमी भार होय. १०
नरदेहाचें उचित, कांहीं करावें आत्महित,
यथानुशक्त्या चित्त वित्त, सर्वोत्तमीं लावावें. ११
हें कांहींच न धरी जो मनीं, तो मृतप्राय वर्ते जनीं,
जन्मास येऊन तेणें जननी, वायांच कष्टविली ! १२

दशक २, समास ४.

---

## ईश्वर.

जेणें केलें चराचर, केले सृष्ट्यादि व्यापार,
सर्वकर्ता निरंतर, नाम जयाचें. १
जेणें केल्या मेघमाळा, चंद्रबिंबीं अमृतकळा,
तेज दिधलें रविमंडळा, जया देवें. २
ज्याची मर्यादा सागरा, जेणें स्थापिलें फणिवरा,
जयाचेनि गुणें तारा, अंतरिक्ष. ३

चारी खाणी चारी वाणी, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी,
जेणें निर्मिले लोक तिन्ही, तया नांव देव. ४
ब्रह्मा विष्णु आणि हर, हे जयाचे अवतार,
तोचि देव हा निर्धार, निश्चयेंसी. ५
जो सृष्टिनिर्माणकर्ता, तो ये सृष्टिपूर्वीं होता,
मग हे तयाची सत्ता, निर्माण झाली. ६
सर्व कर्ता तोचि देव, पाहूं जातां निरवयव,
ज्याची कळा लीला लाघव, नेणती ब्रह्मादिक. ७
देव विमळ आणि अचळ, शास्त्रें बोलती सकळ,
तया निश्चळास चंचळ, ह्मणों नये सर्वथा. ८
जन्ममरणाची वार्ता, देवास लागेना सर्वथा,
देव अमर जयाची सत्ता, त्यास मृत्यु कैसेनी. ९
अवघी सृष्टि जो कर्ता, तो ते सृष्टीहुनी परता,
तेथें संशयाची वार्ता, काढूंच नये. १०

दशक ८, समास १.

---

## ईश्वराचें सगुणत्व.

मुळीं द्रष्टा देव तो एक, त्याचे झाले अनेक,
समजोनि पाहातां विवेक, उमजों लागे. १
देहावेगळी भक्ति पावेना, देहावेगळा देव पावेना,
याकारणें मूळ भजना, देहचि आहे. २
देहेंविण देव कैसा भजावा, देहेंविण देव कैसा पुजावा,
देहेंविण महोत्सव कैसा करावा, कोण्या प्रकारें ! ३

ह्मणोनि देहाविण अडतें, अवघें सांकडेंचि पडतें,
देहाकरतां घडतें, भजन कांहीं. ४
नाना देवीं भजन केलें, तें मूळपुरुषास पावलें,
याकारणें सन्मानिलें पाहिजे, सकळ कांहीं. ५
प्राणी संसार टाकिती, देवास धुंडीत फिरती,
नानाअनुमानीं पडती, जेथें तेथें. ६
कर्तृत्व वेगळें करावें, मग त्या देवासी पाहावें,
तरीच कांहींएक पडे ठावें, गौप्यगुह्य. ७
नाना लीला नाना लाघवें, ते काय जाणिजे बापुड्या जीवें,
संतसंगें स्वानुभवें, स्थिति बाणे. ८
हें ज्ञानदृष्टीनें पाहावें, पाहोनि तेथेंचि राहावें,
निजध्यासें तद्रूप व्हावें, संगत्यागें. ९

दशक १९, समास ५.

---

## सगुणभजन.

ज्ञानी मुक्त होऊनि गेले, त्यांचें सामर्थ्य उगेंच चाले,
कां जे पुण्यमार्गें चालिले, ह्मणोनियां. १
याकारणें पुण्यमार्गें चालावें, भजन देवाचें वाढवावें,
न्याय सोडून न जावें, अन्यायमार्गें. २
निश्चय बैसे वस्तूकडे, तरी ज्ञानमार्गेंही सामर्थ्य चढे,
कोणीएक एकांत मोडे, ऐसें न करावें. ३
एक गुरु एक देव, कोठें तरी असावा भाव,
भावार्थ नसतां वाव, सर्व कांहीं. ४

निर्गुणीं ज्ञान झालें, ह्मणून सगुण अलक्ष केलें,
तरी ते ज्ञाते नागवले, दोहींकडे. ५.
सांडील सगुणभजनासी, तरी तो ज्ञाता परी अपेशी,
ह्मणूनियां सगुणभजनासी, सांडूंच नये. ६
निष्काम बुद्धीचिया भजना, त्रैलोक्यीं नाहीं तुलना,
सामर्थ्येंवीण घडेना, निष्काम भजन. ७
कामनेनें फळ घडे, निष्काम भजनें भगवंत जोडे
फळभगवंता कोणीकडे, महदंतर. ८
नाना फळें देवापासीं, आणि फळ अंतरी भगवंतासी,
याकारणें परमेश्वरासी, निष्काम भजावें. ९
निष्काम भजनाचें फळ आगळें, सामर्थ्य चढे मर्यादेवेगळें,
तेथें बापुडीं फळें, कोणीकडे. १०
भक्तें जें मनीं धरावें, तें देवें आपणाचि करावें,
तेथें वेगळें भावावें, नलगे कदा. ११
दोनी सामर्थ्यें एक होतां, काळासि नाटोपे सर्वथा,
तेथें इतरांची कोण कथा, कीटकन्यायें ! १२
ह्मणोनि निष्काम भजन, वरी विशेष ब्रह्मज्ञान,
तयास तुळितां त्रिभुवन, उणें वाटे. १३
येथें बुद्धीचा प्रकाश, आणिक न चढे विशेष,
प्रताप कीर्ति आणि यश, निरंतर. १४
सारासार विचार करणें, न्याय अन्याय अखंड पाहणें,
बुद्धि भगवंताचें देणें, पालटेना. १५

भक्त भगवंतीं अनन्य, त्यासि बुद्धि देतो आपण,
म्हणूनि सगुण भजन, अनन्यभावें करावें. १६

दशक १०, समास ७.

---

## ईश्वरभक्ति.

भगवंत भावाचा भुकेला, भावार्थ देखोनि भुलला,
संकटीं पावे भाविकाला, रक्षितसे. १
जयास भगवंत आवडे, तयाचें देवास सांकडें,
संसारदु:ख सकळ उडे, निज दासाचें. २
जैसा भाव जयापाशीं, तैसा देव तयाशीं,
जाणे भाव अंतरसाक्षी, प्राणिमात्रांचा. ३
जरी भाव असला मायिक, तरी देव होय महाठक,
नवल तयाचें कौतुक, जैशास तैसा ! ४
दर्पणीं प्रतिबिंब दिसे, जैशास तैसें भासें,
तयाचें सूत्र असे, आपणाच पाशीं. ५
जैसें आपण करावें, तैसेंचि तेणें व्हावें,
जरी डोळे पसरूनि पाहावें, तरी तेंही टवकारे ! ६
भृकुटीस घालूनि मिठी, पाहतां क्रोधें तेंहि उठी,
आपण हास्य करितां पोटीं, तेंही आनंदे ! ७
जैसा भाव प्रतिबिंबला, तयाचाचि देव झाला,
जो जैसें भजे त्याला, तैसाचि ओळे. ८
धन्य तयांची जननी, जे लागले हरिभजनीं,
त्यांहींच एक जन्म जनीं, सार्थक केला. ९

बहुतां जन्मांचे शेवटीं, जेणें चुके आटाआटी,
तो हा नरदेह भेटी, करी भगवंतीं. १०
आयुष्य हेचि रत्नपेटी, माजी भजनरत्नें गोमटीं,
ईश्वरीं अर्पूनियां लुटी, आनंदाची करावी. ११
जयांचा ईश्वरीं जिव्हाळा, ते भोगिती स्वानंदसोहळा,
जयांचा जनावेगळा, ठेवा अक्षयीं. १२
श्वानसूकरादि नीच याती, भोगणें घडे विपत्ती,
तेथें कांहीं उत्तम गती, पाविजेत नाहीं. १३
तुझें तुज नव्हे शरीर, तेथें इतरांचा कोण विचार,
आतां एक भगवंत साचार, धरीं भावार्थबळें. १४
एका दुर्भराकारणें, नाना नीचांची सेवा करणें,
नाना स्तुति आणि स्तवनें, मर्यादा धरावी. १५
जो अन्न देतो उदरासी, शरीर विकावें लागे त्यासी,
मां जेणें घातलें जन्मासी, त्यास कैसें विसरावें? १६
अहर्निशीं ज्या भगवंता, सकळ जीवांची लागली चिंता,
मेघ वर्षे जयाची सत्ता, सिंधु मर्यादा धरी. १७
भूमि धरिली धराधरें, प्रकट होइजे दिनकरें,
ऐसी सृष्टि सत्तामात्रें, चालवी जो कां. १८
ऐसा कृपाळु देवाधिदेव, नेणवे जयाचें लाघव,
जो सांभाळी सकळ जीव, कृपाळुपणें. १९
ऐसा सर्वात्मा श्रीराम, सांडूनि धरिती विषयकाम,
ते प्राणी दुरात्मे अधम, केलें पावती. २०

सांडूनि राम आनंदघन, ज्याचे मनीं विषयचिंतन,
त्यासि कैचें समाधान, लोलंगतासी? २१
जयासि वाटे सुखचि असावें, तेणें रघुनाथभजनीं लागावें,
स्वजन सकळही त्यागावे, दुःखमूळ जें. २२
वक्ता ह्मणे हो एकभावें, भगवद्भजन करावें,
तेणें होईल स्वभावें, समाधान. २३

दशक ३, समास १०.

---

## नवविधा भक्ति.

"कैसें करावें भगवद्भजन?, कोठें ठेवावें हें मन?
भगवद्भजनाचें लक्षण, मज निरूपावें." १
सावध होऊनि श्रोतेजन, ऐका नवविधा भजन,
सच्छास्त्रीं बोलिलें पावन, होइजे येणें. २
श्रवण कीर्तन विष्णुस्मरण, पादसेवन अर्चन वंदन,
दास्य सख्य आत्मनिवेदन, ऐसें हें नवविधा. ३

### १ श्रवण.

प्रथम भजन ऐसें जाण, हरिकथा पुराणश्रवण,
नाना अध्यात्मनिरूपण, ऐकत जावें. ४
ऐसें हें अवघेंचि ऐकावें, परंतु सार शोधूनि घ्यावें,
असार तें जाणोनि त्यागावें, या नांव श्रवणभक्ति. ५
सगुणाचीं चरित्रें ऐकावीं, कां ते निर्गुण अध्यात्म शोधावीं,
श्रवणभक्तीचीं जाणावीं, लक्षणें ऐशीं. ६

सगुण देवाचीं चरित्रें, निर्गुणाचीं तत्त्वें यंत्रें,
हीं दोन्ही परम पवित्रें, ऐकत जावीं. ७
ऐसें श्रवण सगुणाचें, अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें,
विभक्ति सांडूनि भक्तीचें, मूळ शोधावें. ८

दशक ४, समास १.

२ कीर्तन.

सगुण हरिकथा करावी, भगवत्कीर्ति वाढवावी,
अखंड वैखरी वदवावी, यथायोग्य. ९
भगवंतासी कीर्तन प्रिय, कीर्तनें समाधान होय,
बहुत जनांसी उपाय, हरिकीर्तन कलियुगीं. १०
भक्तिज्ञानवैराग्यलक्षण, नीतिन्यायस्वधर्मरक्षण,
साधनमार्ग अध्यात्मनिरूपण, प्रांजळ बोलावें. ११
प्रसंगें हरिकथा करावी, सगुणीं सगुणकीर्ति धरावी,
निर्गुणप्रसंगें वाढवावी, अध्यात्मविद्या. १२
कीर्तन ऐकतां संदेह पडे, सत्य समाधान तें उडे,
नीतिन्यायसाधन मोडे, ऐसें न बोलावें. १३
सगुणकथा या नांव कीर्तन, अद्वैत ह्मणजे निरूपण,
सगुण रक्षून निर्गुण, बोलत जावें. १४
असो हें सकळ सोडून, करावें गुणानुवादकीर्तन,
या नांव भगवद्भजन, दुसरी भक्ति. १५
कीर्तनें अव्यग्रता घडे, कीर्तनें निश्चय सांपडे,
कीर्तनें संदेह बुडे, श्रोत्यावक्त्यांचा. १६

दशक ४, समास २.

## ३ स्मरण.

स्मरण देवाचें करावें, अखंड नाम जपत जावें,
नामस्मरणें पावावें, समाधान. १७
नित्य नेम प्रातःकाळीं, माध्यान्हकाळीं, सायंकाळीं,
नामस्मरण सर्वकाळीं, करीत जावें. १८
हर्षकाळीं विषमकाळीं, पर्वकाळीं प्रस्तावकाळीं,
विश्रांतिकाळीं निद्राकाळीं, नामस्मरण करावें. १९
नामें संकटें नासती, नामें विघ्नं निवारती,
नामस्मरणें पाविजती, उत्तम पद. २०
हरिनामें प्रल्हाद तरला, नाना आघातांपासून सुटला,
नारायणनामें पावन झाला, अजामेळ. २१
नाम स्मरे निरंतर, तें जाणावें पुण्य शरीर,
महादोषांचे गिरिवर, रामनामें नासती. २२
ह्मणोनि नाम अखंड स्मरावें, रूप मनीं आठवावें
तिसरी भक्ति स्वभावें, निरोपिली. २३

दशक ४, समास ३.

## ४ पादसेवन.

पादसेवन तेंचि जाणावें, कायावाचामनोभावें,
सद्गुरूचे पाय सेवावे, सद्गतिकारणें. २४
देव ब्राह्मण महानुभाव, सत्पात्र भजनाचे ठाव,
ऐसिये ठायीं सद्भाव, दृढ धरावा. २५
सेवावे सद्गुरूचे चरण, या नांव पादसेवन,
चौथे भक्तीचें लक्षण, तें हें निरूपिलें. २६

दशक ४, समास ४.

## ५ अर्चन.

पांचवी भक्ति ते अर्चन, अर्चन ह्मणिजे देवतार्चन,
शास्त्रोक्त पूजाविधान, केलें पाहिजे. २७
देवब्राह्मणअग्निपूजन, साधुसंतअतीतपूजन,
आपुले गृहींचें देवतार्चन, या नांव पाचवी भक्ति. २८
परमेश्वराच्या मूर्ति, पाहूं जातां उदंड असती,
त्यांचें अर्चन करावें भक्ति, पांचवी ऐसी. २९
यांहीवेगळे कुळधर्म, सोडूं नये अनुक्रम,
उत्तम अथवा मध्यम, करीत जावें. ३०
नाना तीर्थी क्षेत्रांस जावें, तेथें त्या देवाचें पूजन करावें,
नाना उपचारीं अर्चावें, परमेश्वरासी. ३१
काया वाचा आणि मनें, चित्तें वित्तें जिवें प्राणें,
सद्भावें भगवदर्चनें, या नांव अर्चनभक्ति. ३२
ऐसेंचि सद्गुरूचें भजन, करूनि असावें अनन्य,
या नांव भगवद्भजन, पांचवी भक्ति. ३३
ऐसी पूजा न घडे बरवी, तरी मानसपूजा करावी,
मानसपूजा अगत्य व्हावी, परमेश्वरासी. ३४
मनें भगवंतासि पूजावें, कल्पून सर्वहि समर्पावें,
मानसपूजेचें जाणावें, लक्षण ऐसें. ३५

दशक ४, समास ५.

## ६ वंदन.

सहावी भक्ति तें वंदन, करावें देवासी नमन.
संत साधु आणि सज्जन, नमस्कारीत जावे. ३६

साष्टांग नमस्कारास अधिकारू, नाना प्रतिमा देवगुरू,
अन्यत्र नमनाचा विचारू, अधिकारें करावा. ३७
भक्त ज्ञानी आणि वीतरागी, महानुभाव तापसी योगी,
सत्पात्रें देखोनि वेगीं, नमस्कार घालावे. ३८
जेथें दिसती विशेष गुण, तें तें सद्गुरूचें अधिष्ठान,
याकारणें तयासी नमन, अत्यादरें करावें. ३९
सर्व देवांसी नमस्कारिलें, तें एका भगवंतासी पावलें,
यदर्थीं वचन बोललें, आहे तें शास्त्रीं. ४०
नमस्कारें लीनता घडे, नमस्कारें विकल्प मोडे,
नमस्कारें सख्य घडे, नाना सत्पात्रासी. ४१
नमस्कारें दोष जाती, नमस्कारें अन्याय क्षमिती,
नमस्कारें मोडलीं जडती, समाधानें. ४२
निःशेष करतां नमस्कार, नासती दोषांचे गिरिवर,
आणि मुख्य परमेश्वर, कृपा करी. ४३
परम अन्याय करून आला, आणि साष्टांग नमस्कार घातला,
तरी तो अन्याय क्षमा केला, पाहिजे श्रेष्ठीं. ४४
याकारणें नमस्कारापरतें, आणिक नाहीं अनुसरतें,
नमस्कारें प्राणियातें, सद्बुद्धि लागे. ४५
नमस्कारासि वेंचावें नलगे, नमस्कारासि कष्टावें नलगे,
नमस्कारासि कांहींच नलगे, उपकरण सामग्री. ४६
याकारणें नमस्कार श्रेष्ठ, नमस्कारें वोळती वरिष्ठ,
येथें सांगितली स्पष्ट, सहावी भक्ति. ४७

दशक ४, समास ६.

## ७ दास्य.

सातवें भजन तें दास्य जाणावें, पडिलें कार्य तितुकें करावें,
सदा सन्निधचि असावें, देवद्वारीं. ४८
देवाचें वैभव सांभाळावें, न्यूनपूर्ण पडूंच नेदावें,
चढतें वाढतें वाढवावें, भजन देवाचें. ४९
जयंत्या पर्वें महोत्सव, असंभाव्य चालवी वैभव,
जें देखतां स्वर्गींचे देव, तटस्थ होती. ५०
ऐसें वैभव चालवावें, आणि नीच दास्यत्वहि करावें,
पडिले प्रसंगीं सावध असावें, सर्वकाळ. ५१
सकळांचें करावें पारपत्य, आलियाचें करावें आतिथ्य,
ऐसी हे जाणवी सत्य, सातवी भक्ति. ५२
वचनें बोलावीं करुणेचीं, नाना प्रकारें स्तुतीचीं,
अंतरें निवती सकळांचीं, ऐसें वदावें. ५३
ऐसी हे सातवी भक्ति, निरूपिली यथामति,
प्रत्यक्ष न घडे तरी चित्तीं, मानसपूजा करावी. ५४

दशक ४, समास ७.

## ८ सख्य.

देवासि परम सख्य करावें, प्रेम प्रीतीनें बांधावें,
आठवे भक्तीचें जाणावें, लक्षण ऐसें. ५५
देवास जयाची अत्यंत प्रीती, आपण वर्तावें तेणें रीतीं,
येणेंकरतां भगवंतीं, सख्य घडे नेमस्त. ५६
ऐसें परम सख्य धरितां, देवासि लागे भक्तांची चिंता,
पांडव लाक्षाजोहरीं जळतां, विवरद्वारें काढिले. ५७

जैसें जयाचें भजन, तैसाचि देवहि आपण,
ह्मणोनि हें अवघें जाण, आपणाचिपाशीं. ५८
मेघ चातकावरी वोळेना, तरी चातक पालटेना,
चंद्र वेळेस उगवेना, तरी चकोर अनन्य. ५९
ऐसें असावें सख्यत्व, विवेक धरावें सत्त्व,
भगवंतावरील ममत्व, सांडूंचि नये. ६०
आपलिया मनोगताकारणें, देवावरी क्रोधासि येणें,
ऐसीं नव्हेत कीं लक्षणें, सख्यभक्तीचीं. ६१
देवाचें जें मनोगत, तेंच आपलें उचित,
इच्छेसाठीं भगवंत, अंतरूं नये कीं. ६२
देव भक्तांचा कैवारी, देव पतितांसी तारी,
देव होय सहाकारी, अनाथांचा. ६३
देव अनाथांचा कैपक्षी, नाना संकटांपासोनि रक्षी,
धांविन्नला अंतरसाक्षी, गजेंद्राकारणें. ६४
देव कृपेचा सागर, देव करुणेचा जलधर,
देवासि भक्ताचा विसर, पडणार नाहीं. ६५
ह्मणूनि सख्य देवासि करावें, हितगुज तयास सांगावें,
आठवे भक्तीचें जाणावें, लक्षण ऐसें. ६६

दशक ४, समास ८.

## ९ आत्मनिवेदन.

ऐका निवेदनाचें लक्षण, देवासी वाहावें आपण,
करावें तत्त्वविवरण, ह्मणजे कळे. ६७

भक्त ह्मणजे विभक्त नव्हे, आणि विभक्त ह्मणजे भक्त नव्हे,
विचारेंवीण कांहींच नव्हे, समाधान. ६८
तस्मात् विचार करावा, देव कोण तो ओळखावा,
आपला आपण शोध घ्यावा, अंतर्यामीं. ६९
तत्त्वें तत्त्व जेव्हां सरे, तेव्हां आपण कैंचा उरे,
आत्मनिवेदन येणेंप्रकारें, सहजाचि झालें. ७०
आपण मिथ्या साच देव, देवभक्त अनन्यभाव,
या वचनाचा अभिप्राव, अनुभवी जाणती. ७१
या नांव आत्मनिवेदन, ज्ञानियांचें समाधान,
नववे भक्तीचें लक्षण, निरूपिलें. ७२
ऐसी ही नवविधा भक्ति, केल्या पाविजे सायुज्यमुक्ति,
सायुज्यमुक्तीस कल्पांतीं, चळण नाहीं. ७३

दशक ४, समास ९.

---

## जनस्वभाववर्णन.

जनाचा लालची स्वभाव, आरंभींच ह्मणती देव,
ह्मणजे मजला कांहीं देवो, ऐसी वासना. १
कांहींच भक्ति केली नसतां, आणि इच्छिती प्रसन्नता,
जैसें कांहींच सेवा न करतां, स्वामीस मागती. २
कष्टेंविण फळ नाहीं, कष्टेंविण राज्य नाहीं,
केल्याविण होत नाहीं, साध्य जनीं. ३
आळसें काम नासतें, हें तों प्रत्ययास येतें,
कष्टाकडे चुकवितें, हीन जन. ४

आधीं कष्टाचें दुःख सोसिती, ते पुढें सुखाचें फळ भोगिती,
आधीं आळसें सुखावती, त्यांसि पुढें दुःख. ५
इहलोक अथवा परलोक, दोहींकडे सारखाच विवेक,
दीर्घ सूचनेचें कौतुक, कळलें पाहिजे. ६
मेळविती तितुकें भक्षिती, ते कठिन काळीं मरोनि जाती,
दीर्घ सूचनेनें वर्तती, तेचि भले. ७
इहलोकींचा संचितार्थ, परलोकींचा परमार्थ,
संचितेंवीण व्यर्थ, जित मेले. ८
एकदा मेल्यानें सुटेना, पुनः जन्मोजन्मीं यातना,
आपणास मारी वांचविना, तो आत्महत्यारा. ९
प्रतिजन्मीं आत्मघात, कोणीं करावें गणित,
याकारणें जन्ममृत्य, केंवी चुके. १०
देव सकळ कांहीं करतो, ऐसें प्राणिमात्र बोलतो,
त्याचे भेटीचा लाभ तो, अकस्मात झाला. ११
विवेकाचा लाभ घडे, जेणें परमात्मा ठायीं पडे,
विवेक पाहतां सांपडे, विवेकी जनीं. १२
देवाचें कर्तृत्व आणि देव, कळला पाहिजे अभिप्राव,
कळल्याविण कित्येक जीव, उगेच बोलती. १३
उगेचि बोलती मूर्खपणें, शहाणपण वाढवायाकारणें,
तृप्तीलागीं उपाव करणें, ऐसें झालें. १४
जिहीं उदंड कष्ट केले, ते भाग्य भोगून ठेले,
येर ते बोलताचि राहिले, करंटे जन. १५

करंट्याचें करंट लक्षण, समजोनि जाती विचक्षण,
भल्याचें उत्तम लक्षण, करंट्यास कळेना. १६
त्याची पैसावली कुबुद्धि, तेथें कैंची असेल शुद्धि,
कुबुद्धि तेचि सुबुद्धि, ऐसी वाटे. १७
मनुष्यें शुद्धीस सांडावें, त्याचें काय खरें मानावें,
जेथें विचाराच्या नांवें, शून्याकार. १८
विचारें इहलोक परलोक, विचारें होतसे सार्थक,
विचारें नित्यानित्य विवेक, पाहिला पाहिजे. १९

दशक १८, समास ७.

---

# भाग ४ था.

## लोकनियंतृप्रकरण.

### निस्पृह उपदेश.

ऐका निस्पृहाची शिकवण, युक्ति बुद्धि शहाणपण,
जेणें राहे समाधान, निरंतर. १
सोपा मंत्र परी नेमस्त, साधें औषध गुणवंत,
साधें बोलणें सप्रचीत, तैसें माझें. २
तत्काळचि अवगुण जाती, उत्तम गुणांची होय प्राप्ती,
शब्दऔषध तीव्र श्रोतीं, साक्षेपें सेवावें. ३
निस्पृहता धरूं नये, धरिली तरी सोडूं नये,
सोडिली तरी हिंडूं नये, ओळखीमध्यें. ४
आचारभ्रष्ट होऊं नये, दिल्या द्रव्य घेऊं नये,
उणा शब्द येवों नये, आपणावरी. ५
धड मळीण नेसों नये, गोड अन्न खाऊं नये,
दुराग्रह करों नये, प्रसंगें वर्तावें. ६
करुणाकीर्तन सोडूं नये, अंतर्ध्यान मोडूं नये,
प्रेमतंतु तोडूं नये, सगुणमूर्तीचा. ७
पोटीं चिंता धरूं नये, कष्टें खेद मानों नये,
समयीं धीर सांडूं नये, कांहीं केल्या. ८
अपमानितां शिणों नये, निखंदितां कष्टों नये,
धिक्कारितां झरों नये, कांहीं केल्या. ९

लोकलाज धरों नये, लाजवितां लाजों नये,
खिजवितां खिजों नये, सत्कर्म करितां. १०
शुद्ध मार्ग सोडूं नये, दुर्जनाशीं तंडों नये,
संबंध पडों देऊं नये, चांडाळाशीं. ११
तपीळपण धरों नये, भांडवितां भांडों नये,
उडवितां उडवूं नये, निजस्थिति आपुली. १२
हांसवितां हांसों नये, बोलवितां बोलूं नये,
चालवितां चालों नये, क्षणक्षणा. १३
नेम अंगीं लावूं नये, भरंवसा कोणास देऊं नये,
अंगीकार करों नये, नेमस्तपणाचा. १४
नित्यनेम सांडूं नये, अभ्यास बुडूं देऊं नये,
परतंत्र होऊं नये, कांहीं केल्या. १५
स्वतंत्रता मोडूं नये, निरपेक्षा तोडूं नये,
परापेक्षा होऊं नये, क्षणक्षणा. १६
अनर्गळता करूं नये, लोकलाज धरूं नये,
कोठें तरी होऊं नये, आसक्त कदा. १७
परंपरा तोडूं नये, उपासना मोडूं नये,
ज्ञानमार्ग सोडूं नये; कदाकाळीं. १८
अतिवाद करूं नये, अनीति पोटीं धरूं नये,
रागें भरीं भरों नये; भलतीकडे. १९
न मानी त्यास सांगूं नये, कंटाळवाणें बोलूं नये,
बहुसाल असों नये, एके स्थळीं. २०

दशक १४, समास १.

[ २ ]

थोरपणें असों नये; महत्त्व धरून बैसों नये,
कांहीं मान इच्छूं नये, कोठें तरी. २१
साधेपण सोडूं नये, सानेपण मोडूं नये,
बळात्कारें जोडूं नये, अभिमान अंगीं. २२
कठिण शब्द बोलूं नये, कठिण आज्ञा करूं नये,
कठिण धीरत्व सोडूं नये, कांहीं केल्या. २३
थोरपणें चुकूं नये, न्याय नीति सांडूं नये,
अप्रमाण वर्तूं नये, कांहीं केल्या. २४
कळल्यावीण बोलूं नये, अनुमानें निश्चय करूं नये,
सांगतां दुःख धरूं नये, मूर्खपणें. २५
सावधपण सोडूं नये, व्यापकपण सांडूं नये,
कदा सुख मानूं, निसुंगपणाचें. २६
प्रसंगेंवीण बोलूं नये, अन्वयेंवीण गाऊं नये,
विचारेंवीण जाऊं नये, अविचारपंथें. २७
परोपकार सांडूं नये, परपीडा करूं नये,
विकल्प पडूं देऊं नये, कोणीएकासीं. २८
नेणपण सांडूं नये, संशयात्मक बोलूं नये,
बहुत निश्चय करूं नये, कांहीं केल्या. २९
ज्ञानगर्व धरूं नये, सहसा छळणा करूं नये,
कोठें वाद घालूं नये, कोणीएकासीं. ३०
जाणपणें पुसों नये, अहंभाव दिसों नये,
सांगेन ऐसें ह्मणों नये, कोणाएकासीं. ३१

स्वार्थबुद्धि जडों नये, कोणास भार घालूं नये,
परंपरा सांगूं नये, भिक्षेसाठीं. ३२
प्रपंचप्रस्थीं जाऊं नये, बाष्कळ अन्न खाऊं नये,
पाहुण्यासारिसें घेऊं नये, आमंत्रणें कदा. ३३
प्रयत्नेंवीण राहों नये, आळस दृष्टीं आणूं नये,
देह असतां पाहों नये, वियोग उपासनेचा. ३४
बहुसाल धांवों नये, बहुसाल राहों नये,
बहुकष्ट करों नये, असुदें खोटें. ३५
बहुसाल बोलों नये, अबोलणें कामा नये,
बहुत अन्न खाऊं नये; उपवास खोटा. ३६
बहुसाल निजों नये, बहुत निद्रा मोडूं नये,
बहु नेम धरूं नये; बाष्कळ खोटें. ३७
बहु संग धरूं नये, संतसंग सांडूं नये,
कर्मठपण कामा नये, अनाचार खोटा. ३८
बहु लौकिक सांडूं नये, लोकाधीन होऊं नये,
बहु प्रीति कामा नये, निष्ठुरता खोटी. ३९
बहु संशय धरूं नये, मुक्तमार्ग कामा नये,
देहलोभ धरूं नये, बहु त्रास खोटा. ४०
ज्ञातेपण धरूं नये, ज्ञानेंविण कामा नये,
अतर्क्य वस्तु तर्का नये; तर्केंवीण खोटें. ४१
अबद्ध पोथी लिहूं नये, पोथीवीण कामा नये,
अबद्ध वाचूं नये, वाचल्यावीण खोटें. ४२

जगीं भेद कामा नये, वर्णसंकर करूं नये.
आपला धर्म उडवूं नये, अभिमान खोटा. ४३
आशाबद्ध बोलों नये, विवेकेंवीण चालों नये,
समाधान हालों नये, कांहीं केल्या. ४४
हे शिकवण धरितां चित्तीं, सकळ सुखें वोळंगती,
आंगीं बाणे महंती, अकस्मात. ४५

दशक १४, समास १.

[ २ ]

जाणावें पराचें अंतर, उदासीनता निरंतर,
नीतिन्यायास अंतर, पडोंचि नेदावें. ४६
संकेतें लोक वेधावा, एकूनएक बोधावा,
प्रपंचही सावरावा, यथानुशक्त्या. ४७
प्रसंगसमयो ओळखावा, धीर बहुत असावा,
संबंध पडों न द्यावा, अति परि तयाचा. ४८
दोष देखोनि झांकावे, अवगुण अखंड न बोलावे,
दुर्जन सांपडोनि सोडावे, परोपकार करूनी. ४९
तऱ्हे भरोंच नये, सुचावे नाना उपाय,
नव्हे तेंचि करावें कार्य, दीर्घप्रयत्नें. ५०
फड नासोंच नेदावा, पडिला प्रसंग सांवरावा,
अतिवाद न करावा, कोणाएकाशीं. ५१
दुसऱ्याचें अभीष्ट जाणावें, बहुतांचें बहुत सोसावें,
न सोसे तरी जावें, दिगंतराप्रती. ५२

दुःख दुसऱ्याचें जाणावें, ऐकोनि तरी वांटून घ्यावें,
बरें वाईट सोसावें, समुदायाचें. ५३
अपार असावें पाठांतर, सन्निधचि असावा विचार,
सदा सर्वदा तत्पर, परोपकारासी. ५४
शांति करूनि करवावी, तऱ्हे सांडूनि सांडवावी,
क्रिया करूनि करवावी, बहुतांकरवीं. ५५
करणें असेल अपाय, तरी बोलोन दाखवूं नये,
परस्परेंचि प्रत्यय; प्रचीतीस आणावा. ५६
जो बहुतांचें सोशीना, त्यास बहुत लोक मिळेना,
बहुत सोशितां उरना, महत्त्व आपुलें. ५७
राजकारण बहुत करावें, परंतु कळोंच न द्यावें,
परपीडेवरी नसावें, अंतःकरण. ५८
लोक पारखून सोडावे, राजकारणें अभिमान झाडावे,
पुनः मेळवूनि घ्यावें; दुरील दोरें. ५९
हिरवटासि दूरि धरावें, कचरटासीं न बोलावें,
संबंध पडतां सोडूनि जावें, एकीकडे. ६०
ऐसें असो राजकारण, सांगतां तें असाधारण;
सुचित असतां अंतःकरण, राजकारण जाणे. ६१
पाहतां तरी सांपडेना, कीर्ति करूं तरी राहेना,
आलें वैभव अभिलाषीना, कांहीं केल्या. ६२
एकांची पाठी राखणें, एकांस देखों न शकणें,
ऐसीं नव्हेत कीं लक्षणें, चातुर्याचीं. ६३

न्याय बोलतांहि मानेना, हित तेंचि नये मना,
येथें कांहींच चालेना, त्यागेंविण. ६४

दशक ११, समास ५.

[ ४ ]

बहुत बोलणें ऐकावें, तेथें मौन्यचि धरावें,
अल्पचिन्हें समजावें, जगदंतर. ६५
बाष्कळामध्यें बैसों नये, उद्धटासीं तंडों नये,
आपणाकरितां खंडों नये, समाधान जनांचें. ६६
नेमस्तपण सोडूं नये, जाणपणें फुगों नये,
नाना जनांचें हृदय, मृदुशब्दें उकलावें. ६७
प्रसंग जाणावा नेटका, बहुतांसी जाझु घेऊं नका,
खरें असतांचि नासका, फड होतो. ६८
शोध घेतां आळसों नये, भ्रष्ट लोकीं बैसों नये,
बैसलें तरी टाकों नये, मिथ्या दोष. ६९
अंतर आर्तांचें शोधावें, प्रसंगीं थोडेंच बाचावें,
चटक लावून सोडावें, भल्या मनुष्यासी. ७०
मजालसींत बैसों नये, समाराधनेसी जाऊं नये,
जातां येळीलवाणें होय, जिणें आपुलें. ७१
उत्तम गुण प्रगटवावे, मग भल्यांशीं बोलतां फावे,
भले पाहोनि करावे, शोधूनि मित्र. ७२
उपासनेसारखें बोलावें, सर्व जनांस तोषवावें,
सगट बरेपण राखावें, कोणीएकासी. ७३

उंच नीच ह्मणों नये, सकळांचें निववावें हृदय,
अस्तमानीं जाऊं नये, कोठेंतरी. ७४
जगामध्यें जगमित्र, जिव्हेपाशीं आहे सूत्र,
कोठें तरी सत्पात्र, शोधूनि काढावें. ७५
सकळांमध्यें विशेष श्रवण, श्रवणाहून थोर मनन,
मननें होय समाधान, बहुत जनांचें. ७६
कथा होती तेथें जावें, दूरी दीनासारखें बैसावें,
तेथील सकळ हरद्र ध्यावें, अंतर्यामीं. ७७
तेथें भले आढळती, व्यापक तेही कळों येती,
हळुहळू मंद गती, रीघ करावा. ७८
धूर्तपणें सकळ जाणावें, अंतरीं अंतर बाणावें,
समजल्याविण शिणावें, कासयासी. ७९

दशक १९, समास २.

---

## महापुरुषलक्षण.

स्वता निस्पृह असेना, त्याचें बोलणेंचि मानेना,
कठीण आहे जनार्दना, राजी राखणें. १
परांतर रक्षायाचीं कामें, बहुत कठीण विवेकवर्में,
स्वइच्छेनें स्वधर्में, लोकराहटी. २
उत्कट भव्य तेंचि घ्यावें, मळमळित अवघेंचि टाकावें,
निस्पृहपणें विख्यात व्हावें, भूमंडळीं. ३
अक्षर बरें वाचणें बरें, अर्थांतर सांगणें बरें,
गाणें नाचणें अवघेंचि बरें, पाठांतर. ४

दुर्जनांसि राखों जाणे, सज्जनांसी निववूं जाणे,
सकळांचे मनींचें जाणे, ज्याचें त्यापरी. ५
संगतीचें मनुष्य पालटे, उत्तम गुण तत्काळ उठे,
अखंड अभ्यासीं लगटे, समुदाय. ७
जेथें तेथें नित्य नवा, जनांस वाटे हा असावा,
परंतु लालचीचा गोंवा, पडोंच नेदी. ७
उत्कट निस्पृहता धरिली, त्याची कीर्ती दिगंतीं फांकली,
उत्कट भक्तीनें निवाली, जनमंडळी. ८
कांहीं एक उत्कटेंविण, कीर्ति कदापि नव्हे जाण,
उगेंचि वणवण हिंडोन, काय होतें. ९
याकारणें सावधान असावें, जितुकें होईल तितकें करावें,
भगवत्कीर्तीनें भरावें, भूमंडळ. १०
आपणास जें जें अनुकूल, तें तें करावें तत्काळ,
होईना त्यास निवळ, विवेक उमजवावा. ११
अखंड तजविजा चाळणा जेथें, पाहतां काय उणें तेथें,
एकांतावीण प्राणियांतें, बुद्धि कैंची ? १२

दशक १९, समास ६.

[ २ ]

उदंड मुलें नानापरी, वडिलांचें मन अवघ्यांवरी,
तैसी अवघ्यांची चिंता करी, महापुरुष. १३
जयास कोणाचें सोसेना, तयाची निष्कांचन वासना,
धिक्कारिल्या धिक्कारेना, तोचि महापुरुष. १४

दशक १९, समास ४.

[ २ ]

विचार कळला सांगतां नये, उदंड येती अंतराय,
उपाय योजितां अपाय, आडवे येती. १५
त्याहींमध्यें जो तीक्ष्ण, रिकामा जाऊं नेदी क्षण,
धूर्त तार्किक विचक्षण, सकळां माने. १६
प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें, जाणे सकळांचीं अंतरें,
निरूपणें तदनंतरें, चटक लागे. १७
मतें मतांतरें सगट, प्रत्यय बोलोनि करी सपाट,
दंडक सांडूनि नीट, वेधी जना. १८
नेमकें भेदकें वचनें, अखंड पाहे प्रसंगमानें,
उदास वृत्तीच्या गुमानें, उठोनि जातो. १९
प्रत्यय बोलोनि उठोनि गेला, चटक लागली लोकांला,
नाना मार्ग सांडून त्याला, शरण येती. २०
उदंड करी गुप्तरूपें, भिकाऱ्यासारिखा स्वरूपें,
तेथें यशकीर्तिप्रतापें, सीमा सांडिली. २१
अवघड स्थळीं कठिण लोक, तेथें राहणें नेमक,
सृष्टीमध्यें सकळ लोक, धुंडीत येती. २२
तेथें कोणाचें चालेना, अणुमात्र अनुमानेना,
कट घालून राजकारण, लोक लावी. २३
लोकीं लोक वाढविले, तेणें अमर्याद झाले,
भूमंडळीं सत्ता चाले, गुप्तरूपें. २४
ठायीं ठायीं उदंड तावे, मनुष्यमात्र तितुके झोंबे,
चोहोंकडे उदंड लांबे, परमार्थबुद्धि. २५

ऐसी कीर्ति करोनि जावें, तरीच संसारासि यावें,
दास ह्मणे हें स्वभावें, संकेतें बोलिलें. २६

दशक १९, समास २.

---

## महंतपण.

एका उदकें सकळ झालें, परी पाहोनि पाहिजे सेविलें,
सगट अवघेंच घेतलें, तरी तें मूर्खपण. १
जीवनाचेंच झालें अन्न, अन्नाचें झालें वमन,
परी वमनाचें भोजन, करितां नये ! २
तैसें निंद्य सोडूनि द्यावें, वंद्य तें हृदयीं धरावें,
सत्कीर्तीनें भरावें, भूमंडळ. ३
उत्तमास उत्तम माने, कनिष्ठास तें न माने,
ह्मणून करंटे देवानें, करूनि ठेविले. ४
सांडावें अवघें करंटपण, धरावें उत्तम लक्षण,
हरिकथा पुराणश्रवण, नीतीन्यायें. ५
वर्तायाचा विवेक, राजी राखणें सकळ लोक,
हळुहळू पुण्यश्लोक, करीत जावे. ६
मुलाचे चालीनें चालावें, मुलाचे मनोगतें बोलावें,
तैसें जनांस शिकवावें, हळुहळू. ७
मुख्य मनोगत राखणें, हींच चातुर्याचीं लक्षणें,
चतुर तो चतुरांग जाणे, इतर तीं वेडीं. ८
वेड्यांस वेडे ह्मणों नये, वर्म कदापि बोलों नये,
तरीच घडे दिग्विजय, निस्पृहासी. ९

उदंड स्थळीं उदंड प्रसंग, जाणोनि करणें यथासांग,
प्राणिमात्रांचा अंतरंग, होऊन जावें. १०
मनोगत राखों न जातां, परस्परें होय अवस्था,
मनोगत तोडितां व्यवस्था, बरी नाहीं. ११
याकारणें मनोगत, राखेल तो मोठा महंत,
मनोगत राखतां समस्त, ओढोनि येती. १२

दशक १३, समास १०.

[२]

थोडें बोलोनि समाधान करणें, रागेजोनि तरी मन धरणें,
मनुष्य वेधीं लावणें, कोणीएक. १३
सोसवेना चिणचिण केली, तेथें तामसवृत्ती दिसोन आली,
अवघी आवडी उडाली, श्रोतयांची. १४
कोण कोण राजी राखिले, कोण कोण मनीं भंगले,
क्षणक्षणीं परीक्षिले, पाहिजे लोक. १५
जिकडेतिकडे कीर्ति माजे, सगट लोकांस हव्यास उपजे,
लोक राजी राखोनि कीजे, सकळ कांहीं. १६
जिकडे जग तिकडे जगन्नायक, कळला पाहिजे विवेक,
रात्रंदिवस विवेकी लोक, संभाळीत जाती. १७
जो जो लोक दृष्टीस पडला, तो तो नष्ट ऐसा कळला,
अवघे नष्ट एकला भला, कशावरूनी ? १८
तस्मात् लौकिकीं वर्ततां नये, त्यास महंती कामा नये,
परत्र साधनाचा उपाय, श्रवण करूनि असावें. १९

आपणास बरें पोहतां नये, लोक बुडवावयाचें कोण कार्य ?
गोडी आवडी वायां जाय, विकल्पचि अवघा. २०
अभ्यासें प्रगट व्हावें, नाहीं तरी झांकोनि असावें,
प्रगट होऊनि नासावें, हें बरें नव्हे ! २१
हीं धक्काधक्कीचीं कामें, तीक्ष्ण बुद्धीचीं वर्मे,
भोळ्याभावार्थे संभ्रमें, कैसें घडे ? २२
आपलें लोकांस मानेना, लोकांचें आपणास मानेना,
अवघा विकल्पचि मना, समाधान कैंचें ? २३
संगीत चालला तरी तो व्याप, नाहीं तरी अवघाच संताप,
क्षणक्षणां विक्षेप, किती ह्मणोनि सांगावा ? २४
कारभार आटोपेना, करवेना आणि उगेंहि राहेना !
याकारणें सकळ जना, काय ह्मणावें ? २५
आतां हें आपणाचपाशीं, बरें विचारावें आपणाशीं,
अनुकूळ पडेल तैशी, वर्तणूक करावी. २६

दशक १९, समास ७.

[ ३ ]

जितुकें कांहीं आपणास ठावें, तितुकें हळुहळू शिकवावें,
शहाणे करून सोडावे, बहुत जन. २७
परोपरी शिकवणें, आडणुका सांगत जाणें,
निवळ करूनि सोडणें, निस्पृहांसी. २८
होईल तें आपण करावें, न होतां जनाकरवीं करवावें,
भगवद्भजन राहावें, हा धर्म नव्हे. २९

आपण करावें करवावें, आपण विवरावें विवरवावें,
आपण धरावें धरवावें, भजनमार्गासी. ३०
उपाधींत सांपडों नये, उपाधीस कटाळूं नये,
निसुगपण कामा नये, कोणाएकविशीं. ३१
कीर्ति पाहतां सुख नाहीं, सुख पाहतां कीर्ति नाहीं,
केल्याविण कांहींच नाहीं, कोठें तरी. ३२
येरवीं काय राहतें, होणार तितुकें होऊन जातें,
प्राणी मात्र अशक्त तें, पुढें आहे. ३३
आधींच तकवा सोडिला, मध्येंच धिंवसा सांडिला,
तरी संसार हा शेवटाला, कैसा पावे ? ३४
संसार मुळींच नासका, विवेकें करावा नेटका,
नेटका करितां फिका, होत जातो. ३५
ऐसा याचा जीनसाना, पाहातां कळों येतें मना,
परंतु धीर सांडावा ना, कोणींएकें. ३६
धीर सांडितां काय होतें, अवघें सोसावें लागतें,
नाना बुद्धि नाना मतें, शहाणा जाणे. ३७

दशक १९, समास १०.

---

## महंतलक्षण.

शुद्ध नेटकें लिहावें, लिहून शुद्ध शोधावें,
शोधून शुद्ध वाचावें, चुकों नये. १
जाणायाचें सांगतां नये, सांगायाचें नेमस्त नये,
समजल्यावीण कांहींच नये, कोणीएक. २

पुसों जाणे सांगों जाणे, अर्थांतर करूं जाणे,
सकळिकांचें राखों जाणे, समाधान. ३
दीर्घ सूचना आधीं कळे, सावधपणें तर्क प्रबळे,
जाणजाणोनि निवळे, यथायोग्य. ४
ऐसा जाणे जो समस्त, तोचि महंत बुद्धिवंत,
यावेगळें अंतवंत, सकळ कांहीं. ५
ताळवेळ तानमानें, प्रबंध कविता जाडवचनें,
मजालसी नाना चिन्हें, सुचतीं जया. ६
जो एकांतासी तत्पर, आधीं करी पाठांतर,
अथवा शोधी अर्थांतर, ग्रंथगर्भींचें. ७
अक्षर सुंदर वाचणें सुंदर, बोलणें सुंदर चालणें सुंदर,
भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर, करूनि दावी. ८
जयास यत्नचि आवडे, नानाप्रसंगीं पवाडे,
धीटपणें प्रगटे दडे, ऐसा नव्हे. ९
सांकडीमधें वर्तों जाणे, उपाधीमधें मिळों जाणे.
अलिप्तपणें राखों जाणे, आपणासी. १०
आहे तरी सर्वां ठायीं, पाहों जातां कोठेंच नाहीं,
जैसा अंतरात्मा ठायींच्या ठायीं, गुप्त जाहला. ११
त्यावेगळें कांहींच नसे, पाहों जातां तो न दिसे,
न दिसोन वर्तवीतसे, प्राणिमात्रांसी. १२
तैसाचि हाही नानापरी, बहुत जनांसी शहाणे करी,
नाना विद्या त्या विवरी, स्थूळ सूक्ष्म. १३

आपणाकरितां शहाणे होती, ते सहजाचि सोय धरिती,
जागतेपणाची महंती, ऐसी असे. १४
राखों जाणे नीति न्याय, न करी न करवी अन्याय,
कठिण प्रसंगीं उपाय, करूं जाणे. १५
ऐसा पुरुष धारणेचा, तोचि आधार बहुतांचा,
दास ह्मणे रघुनाथाचा, गुण घ्यावा. १६

दशक ११, समास ६.

[ २ ]

मूर्ख एकदेशी होतो, चतुर सर्वत्र पाहातो,
जैसा बहुधा होऊनि भोगितो, नाना सुखें. १७
तोचि अंतरात्मा महंत, तो कां होईल संकोचित,
प्रशस्त जाणता समस्त, विख्यात योगी. १८
कीर्तिरूपें उदंड ख्यात, जाणती लहानथोर समस्त,
वेष पाहतां शाश्वत, एकहि नाहीं. १९
प्रगट कीर्ति ते ढळेना, बहुत जनांस कळेना,
पाहों जातां आढळेना, काय कैसें. २०
वेषभूषण तें दूषण, कीर्तिभूषण तें भूषण,
चाळणेवीण एक क्षण, जाऊंच नेदी. २१
बहुतीं शोधूनि पाहिलें, बहुतांच्या मनास आलें,
तरी मग जाणावें साधलें, महत्कृत्य. २२
अखंड एकांत सेवावा, अभ्यासाचि करीत जावा,
काळ सार्थकचि करावा, जनांसहित. २३

उत्तम गुण तितुके घ्यावे, घेऊनि जनास शिकवावे,
उदंड समुदाय करावे, परी गुप्तरूपें. २४
अखंड कामाची लगबग, उपासनेस लावावें जग,
लोक समजों/नि मग, आज्ञा इच्छिती. २५
आधीं कष्ट सुफळ, कष्टाचि नाहीं तें निर्फळ,
साक्षेपेंवीण केवळ, वृथा पुष्ट. २६
लोक बहुत शोधावे, त्यांचे अधिकार जाणावे,
जाणजाणोनि धरावे, जवळी दूरी. २७
अधिकारपरत्वें कार्य होतें, अधिकार नसतां व्यर्थ जातें,
जाणोनि शोधावीं चित्तें, नाना प्रकारें. २८
अधिकार पाहोनि कार्य सांगणें, साक्षेप पाहोनि विश्वास धरणें,
आपला मगज राखणें, कांहीं तरी. २९
हें प्रचीतीनें बोलिलें, आधीं केलें मग सांगितलें,
मानेल तरी पाहिजे घेतलें, कोणीएकें. ३०
महंतें महंत करावे, युक्तिबुद्धीनें भरावे,
जाणते करूनि विखरावे, नाना देशीं. ३१

दशक ११, समास १०.

---

## महंतकर्तव्य.

स्वभावेंचि नेमक बोलती, सहजचि नेमक चालती,
अपूर्व बोलण्याची स्थिती, सकळांस माने. १
सकळ अवगुणांमध्यें अवगुण, आपले अवगुण वाटती गुण,
मोठें पाप करंटपण, चुकेना कीं. २

मोठीं राजकारणें चुकती, राजकारणें वेडां लागती,
नाना चुकीची फजिती, चहूंकडे. ३
या कारणें चुकों नये, ह्मणिजे उदंड उपाय,
उपायाचा अपाय, चुकतां होय. ४
काय चुकलें तें कळेना, मनुष्याचें मनचि वळेना,
खवळला अभिमान गळेना, दोहींकडे. ५
अवघे फडचि नासती, लोकांचीं मनें भंगती,
कोठें चुकते युक्ती, कांहीं कळेना. ६
व्यापेंवीण आटोपा केला, तो अवघा घसरतचि गेला,
अकलेचा बंध नाहीं घातला, दूरदृष्टीनें. ७
ज्यास उपाधि आवरेना, तेणें उपाधि वाढवेना,
सावचित करूनियां मना, समाधानें असावें. ८
धांवधांवोनि उपाधि वेष्टी, आपण कष्टी लोकहि कष्टी,
हे कामा नये गोष्टी, कुसमुसेची. ९
लोक बहुत कष्टी झाला, आपणही अत्यंत नासला,
व्यर्थचि केला गलबला, कासयासी ? १०
असो उपाधीचें काम ऐसें, कांहीं बरें कांहीं काणोसें,
सकळ समजोनि ऐसें, वर्ततां बरें. ११
जो उपाधीस कंटाळला, तो निवांत होऊनि बैसला,
आटोपेना तो गलबला, कासयासी. १२
कांहीं गलबला कांहीं निवळ, ऐसा कंठित जावा काळ,
जेणेंकरतां विश्रांती वेळ, आपणास फावे. १३

उपाधि कांहीं राहात नाहीं, समाधानाएवढें थोर नाहीं,
नरदेह प्राप्त होत नाहीं, क्षणक्षणां. १४

दशक १९, समास ८.

---

## राजकारण.

अखंड राहातां सलगी होते, अतिपरिचयें अवज्ञा घडते,
याकारणें विश्रांतीतें, घेतांचि नये. १

आळसें आळस केला, तरी मग कारभारचि बुडाला,
अंतरहेत चुकत गेला, समुदायाचा. २

चोर भांडारी करावा, घसरतांचि संभाळावा,
गोंवा मूर्खपणाचा काढावा, हळुहळू. ३

नष्टासि नष्ट योजावे, वाचाळासि वाचाळ आणावे,
आपणावरी विकल्पाचे गोवें, पडोंचि नेदी. ४

कांटीनें कांटी झाडावी, झाडावी परि ते कळों न द्यावी,
कळकटपणाची पदवी, असों द्यावी. ५

कोणीएक काम करतां होतें, न करतां तें मागें पडतें,
याकारणें ढिलेपण तें, असोंचि नये. ६

जो दुसऱ्यावरी विश्वासला, त्याचा कार्यभाग बुडाला,
जो आपणचि कष्टत गेला, तोचि भला. ७

अवघ्यांस अवघें कळलें, तेव्हां तें रितें पडलें,
याकारणें ऐसें घडलें, न पाहिजे कीं. ८

मुख्य सूत्र हातीं घ्यावें, करणें तें लोकांकरवीं करवावें,
कित्येक खलक उगवावे, राजकारणांमध्यें. ९

खळदुर्जनासि भ्यालें, राजकारण नाहीं राखलें,
तेणें अवघें प्रगट झालें, बरें वाईट. १०
दुर्जन प्राणी समजावे, परी ते प्रगट न करावे,
सज्जनापरीस आळवावे, महत्त्व देउनी. ११
जनांमध्यें दुर्जन प्रगट, तरी मग अखंड खटखट,
याकारणें ते वाट, बुझून टाकावी. १२
हीं धूर्तपणाचीं कामें, राजकारण करावें नेमें,
ढिलेपणाच्या संभ्रमें, जाऊं नये. १३
जैशास तैसा जेव्हां भेटे, तेव्हां मजालसी थाटे,
इतुकें होतें परी धनी कोठें, दृष्टीस न पडे. १४

दशक १९, समास ९.

---

## समर्थपणा.

कोणी एका कार्याचा साक्षेप, कांहीं तरी घडे विक्षेप,
काळसाह्यें तें आपोआप, होत जातें. १
कार्यभाग होत चालिला, तेणें प्राणी सुखी झाला,
विचारही सुचों लागला, दिवसेंदिवस. २
कोणी एक प्राणी जन्मास येतो, कांहीं तरी काळ साह्य होतो,
दुःखाउपरी सुख देतो, देव कृपाळुपणें. ३
अवघाच काळ जरी सजे, तरी अवघेच होती राजे,
कांहीं सजे कांहीं न सजे, ऐसें आहे. ४
ऐकल्याविण कळलें, शिकल्याविण शहाणपण आलें,
देखिलें ना ऐकलें, भूमंडळीं ! ५

सकळ कांहीं ऐकतां कळे, कळतां कळतां वृत्ति निवळे,
नेमस्त मनामध्यें आकळे, सारासार. ६

श्रवण ह्मणजे ऐकावें, मनन ह्मणजे मनीं धरावें,
येणें उपायें स्वभावें, त्रैलोक्य चाले. ७

माझें होय तुझें नव्हे, ऐसी अखंड जयास सवे,
न्यायनीति सांडून धांवे, अन्यायाकडे. ८

आपुल्या थोरपणासाठीं, आचावचा तोंड पिटी,
न्याय नाहीं ते शेवटीं, परम अन्यायी. ९

एकीकडे अभिमान उठे, दुसरीकडे उदंड पेटे,
ऐसे श्रोते खरे खोटे, कोण जाणे. १०

ह्मणोनि जाणते विचक्षण, ते आधींच धरिती नेणपण,
मूर्ख टोणपा आपण, कांहींच नाहीं. ११

आपणाहूनि देव थोर, ऐसा जयास कळला विचार,
सकळ कांहीं जगदंतर, तेहीं राखावे. १२

सभेमध्यें कलह झाला, शब्द येतो जाणत्याला,
अंतर राखों नाहीं शिकला, कैसा योगी. १३

वैर करतां वैरचि वाढे, आपणास दुःख भोगणें घडे,
ह्मणून शहाण्याचे कुकडे, कळों आले. १४

अखंड आपणा संभाळिती, क्षुल्लकपण येऊं न देती,
थोर लोकांस क्षमा शांति, अगत्य करणें. १५

अवगुणापाशीं बैसला गुणी, अवगुण कळतो तत्क्षणीं,
विवेकी पुरुषाची करणी, विवेकें होते. १६

उपाय पर्याय दीर्घ प्रयत्न, विवेकबळें नाना यत्न,
करील तयाचें महिमान, तोचि जाणे. १७
दुर्जनीं वेवदरून घेतला, बाष्कळ लोकीं घसरिला,
विवेकापासून चेवला, विवेकी कैसा. १८
न्याय पर्याय उपाय, मूर्खास हें कळे काय,
मूर्खाकरितां चिवडा होय, मजालसीचा. १९
मग ते शहाणे नीट करिती, स्वयें साहोनि साहविती,
स्वयें करून कराविती, लोकांकरवीं. २०
बहुत जनांस चाळवी, नानामंडळें हालवी,
ऐसी हे समर्थपदवी, विवेकें होते. २१

दशक १८, समास १०.

---

# परिशिष्ट.

## मनाचे श्लोक.

मना सज्जना ! भक्तिपंथेंच जावें,
तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावें;
जनीं निंद्य तें सर्व सोडोनि द्यावें,
जनीं वंद्य तें सर्वभावें करावें. १

मना ! वासना दुष्ट कामा नये रे !
मना ! सर्वथा पापबुद्धी नको रे !
मना ! सर्वथा नीति सोडूं नको हो !
मना ! अंतरीं सार वीचार राहो. २

मना ! पापसंकल्प सोडोनि द्यावा,
मना ! सत्यसंकल्प जीवीं धरावा;
मना ! कल्पना ते नको वीषयाची,
विकारें घडे हो जनीं सर्व छी छी ! ३

नको रे मना ! क्रोध हा खेदकारी,
नको रे मना ! काम नानाविकारी;
नको रे मना ! लोभ हा अंगिकारूं,
नको रे मना ! मत्सरू दंभभारू. ४

मना ! श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें,
मना ! बोलणें नीच सोशीत जावें;

स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें,
मना ! सर्व लोकांसि रे नीववावें. ५

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी,
मना सज्जना ! हेचि क्रीया धरावी;
मना ! चंदनाचे परी त्वां झिजावें,
परी अंतरीं सज्जना नीववावें. ६

जनीं सर्व सूखी असा कोण आहे ?
विचारीं मना ! तूंचि शोधूनि पाहें;
मना त्वांचि रे ! पूर्व संचीत केलें,
तयासारखें भोगणें प्राप्त झालें. ७

नको रे मना ! द्रव्य तें पूढिलांचें,
अती स्वार्थबुद्धी नको पाप साचें;
घडे भोगणें पाप तें कर्म खोटें,
न होतां मनासारखें दुःख मोठें. ८

मना ! सर्वथा सत्य सांडूं नको रे !
मना सर्वथा मिथ्य मांडूं नकोरे !
मना ! सत्य तें सत्य वाचे वदावें,
मना ! मिथ्य तें मिथ्य सोडूनि द्यावें. ९

समर्थाचिया सेवका वक्र पाहे,
असा सर्व भूमंडळीं कोण आहे ?
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. १०

सदा सर्वदा देव सन्नीध आहे,
कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे;
सुखानंद आनंद कैवल्यदानी,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. ११

असे हो ! जया अंतरीं भाव जैसा,
वसे हो ! तया अंतरीं देव तैसा !
अनन्यास रक्षीतसे चापपाणी,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. १२

सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा,
उडी घालितो संकटीं स्वामि तैसा !
हरीभक्तिचा घाव घाली निशाणीं,
नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. १३

मना ! पाविजे सर्वही सूख जेथें,
अती आदरें ठेविजे लक्ष तेथें;
विवेकें कुडी कल्पना पालटीजे,
मना सज्जना ! राघवीं वस्ति कीजे. १४

जयाचेनि संगें समाधान भंगे,
अहंता अकस्मात येऊनि लागे;
तये संगतीची जनीं कोण गोडी,
जये संगतीनें मती राम सोडी. १५

सदा बोलण्यासारखें चालताहे,
अनेकीं सदा एक देवासि पाहे;

सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा,
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा. १६

सदा आर्जवी, प्रीय जो सर्व लोकीं,
सदा सर्वदा सत्यवादी, विवेकी;
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा,
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा. १७

दिनाचा दयाळू, मनाचा मवाळू,
स्नेहाळू, कृपाळू, जगीं दासपाळू;
जया अंतरीं क्रोध संताप कैंचा !
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा. १८

अती मूढ त्या दृढ बुद्धी असेना,
अती काम त्या राम चित्तीं वसेना;
अती लोभ त्या क्षोभ होईल जाणा,
अती वीषयी सर्वदा दैन्यवाणा. १९

सुखानंदकारी निवारी भयातें,
जनीं भक्तिभावें भजावें तयातें;
विवेकें त्यजावा अनाचार हेवा,
प्रभाते मनीं राम चिंतीत जावा. २०

समस्तामधें सार साचार आहे,
कळेना तरी सर्व शोधूनि पाहे;
मना संशयो वाउगा तो त्यजावा,
प्रभाते मनीं राम चिंतीत जावा. २१

यथासांग तें कर्म कांहीं घडेना,
घडे कर्म तें पुण्य गांठी पडेना;
दया पाहतां सर्व भूतीं असेना,
फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ! २२

अती लीनता सर्वभावें स्वभावें,
जना सज्जनालागिं संतोषवावें;
देहे कारणीं सर्व लावीत जावें,
सगूणीं अती आदरेंशीं भजावें. २३

क्रियेवीण नानापरी बोलिजे तें,
परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें;
मना कल्पना धीट सैराट धांवे,
तया मानवा देव कैसेनि पावे ? २४

विवेकें क्रिया आपुली पालटावी,
अती आदरें शुद्ध बुद्धी धरावी;
जनीं बोलण्यासारिखें चाल बापा !
मना ! कल्पना सोडिं संसारतापा. २५

सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें,
क्रिया पालटे भक्तिभावार्थ लागे;
क्रियेवीण वाचाळता ते निवारी,
तुटे वाद संवाद तो हीतकारी. २६

जनीं वादवेवाद सोडूनि द्यावा,
जनीं सूखसंवाद सूखें करावा;

जनीं तोच तो शोकसंतापहारी,
तुटे वाद-संवाद तो हीतकारी. २७

तुटे वाद-संवाद त्यातें ह्मणावें,
विवेकें अहंभाव त्यातें जिणावें;
अहंतागुणें वाद नानाविकारी,
तुटे वाद संवाद तो हीतकारी. २८

हिताकारणें बोलणें सत्य आहे,
हिताकारणें सर्व शोधोनि पाहे;
हिताकारणें बंड पाखंड वारी,
तुटे वाद-संवाद तो हीतकारी. २९

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ?
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे;
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे,
विचारें तुझा तूंच शोधोनि पाहें. ३०

तुटे वाद संवाद तेथें करावा,
विवेकें अहंभाव तो पालटावा;
जनीं बोलण्यासारखें आचरावें,
क्रिया पालटे भक्तिपंथेंचि जावें. ३१

मना ! अल्प संकल्प तोही नसावा,
मना ! सत्यसंकल्प जीवीं बसावा;
मना ! जल्प वीकल्प तोही त्यजावा,
रमाकांत एकांतकाळीं भजावा. ३२

विचारोनि बोले, विवंचोनि चाले,
तयाचेनि संतप्त तेही निवाले;
बरें शोधिल्यावीण बोलूं नको हो !
सदा चालणें शुद्ध नेमस्त राहो. ३३

धरीं रे मना ! संगती सज्जनाची,
जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची;
बळें भाव सद्वृत्ति सन्मार्ग लागे,
महाक्रूर हा काळ विक्राळ भंगे. ३४

जयें मक्षिका भक्षिली जाणिवेची,
तया भोजनाची रुचि प्राप्त कैंची ?
अहंभाव ज्या मानसींचा विरेना,
तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना. ३५

नको रे नको ! वाद हा खेदकारी,
नको रे नको भेद नानाविकारी;
नकीं रे मना ! शीकवूं पूढिलांसी,
अहंभाव जो राहिला तूजपाशीं ! ३६

अहंतागुणें सर्वही दुःख होतें,
मुखीं बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें;
सुखें राहतां सर्वही सूख आहे,
अहंता तुझी तूंच शोधोनि पाहें. ३७

अहंतागुणें नीति सांडी विवेकी,
अनीतीबळें श्लाघ्यता सर्व लोकीं;

परी अंतरीं सर्वही साक्ष येते,
प्रमाणांतरें बुद्धि सांडोनि जाते. ३८

नव्हे वाउगी चाउटी काम पोटीं,
क्रियेवीण वाचाळता तेचि मोठी;
मुखें बोलण्यासारखें चालताहे,
मना सद्गुरू तोचि शोधोनि पाहें. ३९

जगीं भक्त, ज्ञानी, विवेकी, विरागी,
कृपाळू, मनस्वी, क्षमावंत, योगी;
प्रभू, दक्ष, व्युत्पन्न, चातुर्य जाणे,
तयाचेनि योगें समाधान बाणे. ४०

नव्हे जाणतां नेणतां देवराणा,
नये वर्णितां वेदशास्त्रां पुराणां;
नसे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा,
श्रुती नेणती नेणती अंत ज्याचा. ४१

नभीं वावरे जो अणूरेणु कांहीं,
रिता ठाव या राघवेंवीण नाहीं !
तया पाहतां पाहतां तेंचि झालें,
तिथें लक्ष आलक्ष सर्वे बुडालें. ४२

वसे हृदयीं जाण तो देव ऐसा,
नभाचे परी व्यापकू जाण तैसा;
सदा संचला, येत ना जात कांहीं,
तयावीण कोठें रिता ठाव नाहीं. ४३

मना ! सर्वही संग सोडोनि द्यावा,
अती आदरें सज्जनाचा धरावा;
जयाचेनि संगें महादुःख भंगे,
जगीं साधनेंवीण सन्मार्ग लागे. ४४

मना ! गूजरे तूज हें प्राप्त झालें,
परी पाहिजे अंतरीं यत्न केले;
सदा श्रवणें पाविजे निश्चयासी,
धरीं सज्जनीं संगती, धन्य होसी. ४५

---

## लघुबोध.

बरें सत्य बोला, यथातथ्य चाला,
बहू मानिती लोक येणें तुम्हाला;
धरा बुद्धि पोटीं विवेकें मुलें हो !
भला गूण तो अंतरामाजि राहो. १

सदा दांत घांसोनियां ते धुवावे,
कळाहीन ते शूद्रमूखी नसावे;
सदा सर्वदा यत्न सोडूं नये रे,
बहूसाळ हा खेळ कामा नये रे! २

दिसामाजि कांहीं तरी तें लिहावें,
प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें;
गुण श्रेष्ठ ऊपास्य त्याचें करावें,
बरें बोलणें सत्य जीवीं धरावें. ३

बहु खेळ खोटा, सदालस्य खोटा,
समस्तांस भांडेल तोची करंटा !
बहूतां जनालागिं जीवीं धरावें,
भल्या संगतीं न्याय तेथें भजावें. ४

हिशेबीं सदा न्याय सांडूं नयेरे !
कदाचीत अन्याय होतां ढकारे !
जनीं सांडतां न्याय रे दुःख होतें,
महासौख्य तेंही अकस्मात जातें. ५

प्रचीतीविणें बोलणें सर्व वायां,
विवेकेंविणें सर्वही दंभ झाला;
बहु सज्जला, नेटका साज केला,
विचारेंविणें सर्वही व्यर्थ गेला. ६

वरी चांगला अंतरीं गोड नाहीं,
तया मानवाचें जिणें व्यर्थ पाहीं !
वरी चांगला अंतरीं गोड आहे,
तयालागिं कोणी तरी शोधिताहे. ७

सदा अंतरीं गोड तें सांडवेना,
कदा अंतरीं ओखटें देखवेना;
ह्मणूनी बरा गूण आधीं धरावा,
महाघोर संसार हा नीरसावा. ८

भलारे भला बोलती तें करावें,
बहूतां जनांचे मुखें येश घ्यावें;

परी शेवटीं सर्व सोडोनि द्यावें,
मरावें परी कीर्तिरूपें उरावें. ९

बरा वोखटा सर्व संसार झाला,
अकस्मात येईल रे येमघाला !
ह्मणोनी भले संगतीं सत्य चाला,
जगीं दास तो शीकवीतो मुलाला. १०



# कांहीं वाचनीय पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | न्या. मू. रानडे यांचीं व्याख्यानें. | १-८-० |
| २ | आत्मवृत्त. | १-८-० |
| ३ | आमच्या आठवणी. | १-४-० |
| ४ | श्रीरामकृष्ण. | १-४-० |
| ५ | स्वामी रामतीर्थ, भाग १ ला. | १-४-० |
| ६ | स्वामी रामतीर्थ, भाग २ रा. | १-४-० |
| ७ | बुद्धलीलासार. | १-४-० |
| ८ | डॉ. आनंदीबाई जोशी. | १-४-० |
| ९ | बोधपर व्याख्यानें. | १-०-० |
| १० | आत्मोद्धार. | १-०-० |
| ११ | राजा राममोहन राय. | ०-१२-० |
| १२ | तुकाराम. | ०-१०-० |
| १३ | एकनाथ. | ०-१०-० |
| १४ | रामकृष्ण-बोधवचनें. | ०-[illegible] |
| १५ | साक्रेटीस. | ०-८-० |
| १६ | ऐतिहासिक स्त्रिया. | ०-८-० |
| १७ | स्वास्थ्यसंरक्षण. | ०-८-० |
| १८ | मोरोपंती भगवद्गीता. | ०-६-० |
| १९ | श्रेयःसाधन. | ०-६-० |
| २० | अमेरिकेंतील विद्यार्थी. | ०-४-० |

**मनोरंजन कार्यालय, गिरगांव, मुंबई.**